# पहिला पाऊस

[ल घु क था सं ग्र ह]

पुरुषोत्तम भास्कर भावे




* ४६ *

मूल्य सव्वा दोन रुपये

प्रस्तुत कथासंग्रहांतील "दया" ह्या गोष्टीचें प्रो. चिं. वि. जोशी ह्यांच्या "रिक्षा" नामक कथेशीं विलक्षण साम्य आहे, परंतु माझ्या ह्या गोष्टीचा प्रकाशनकाल श्री. जोशी ह्यांच्या कथेच्या प्रकाशनकाळापेक्षां एक वर्षानें अलीकडचा आहे. ह्या संग्रहांतील प्रत्येक गोष्ट पूर्णपणें स्वतंत्र आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | पहिला पाऊस | ९ |
| २ | सार्थक ! | २४ |
| ३ | पाखरूं | ३९ |
| ४ | सोबतीण | ४४ |
| ५ | हेमांगिनीचें प्रेम ! | ५७ |
| ६ | निष्ठा | ७२ |
| ७ | दया ! | ८३ |
| ८ | विश्वकर्मा चित्रालय | ९० |
| ९ | व्यथा | १०३ |
| १० | पुनर्जन्म | १२१ |




# पहिला पाऊस

गेले कांहीं दिवस सारखी सरत्या उन्हाळ्याची तलखी चालली होती. जमिनीला भाजून तडा पडल्या होत्या. सगळा समुद्र तिनें हपापल्या तोंडानें पिऊन टाकला असता. आभाळांतून जळते निखारे गळत होते. कुठें कुठें हिरव्या गवताचा अंकुर म्हणून दिसत नव्हता. सारें कसें करडें, भकास आणि गरम! पहाटे वारे वाहात ते सुद्धा कोमट कोमट! आणि मग डोळे वटारून सूर्य वर आला कीं दाही दिशांना एकदम पेटलेल्या भट्टीचा तांबडा लाल रंग चढे. वाटे, कीं हा सरता उन्हाळा कसला, ह्या भयंकर तापाला आतां कोठें अंतच नाहीं! दुपारीं सारें कसें मरगळून जाई. चोहींकडे शांत! भडकत जाणाऱ्या उन्हाचा मात्र "सुम्म्" असा विलक्षण आवाज होई. मध्येंच एखादी घार किलकिल करीत वर चढे. खार वरून टुकटुक पाही. चुकार गुरें कान हालवीत वळचणीचा आसरा शोधीत. आमचा पोपट खसताटीशेजारीं लावलेल्या पिंजऱ्यांत आपल्या गोल डोळ्यांवर कातडी ओढून समाधि लावी. मोत्या कुत्रा लांहालांहा करीत न्हाणीघरांत आंगाची गुंडाळी करून बसे. आणि नाकांतून गरम वाफा सोडीत वारा मधूनच धावत जाई!

उन्हाळ्याचा कडाका सुरू झाला, तेव्हांपासूनच मोठ्या माणसांनीं पोक्तपणाचा विचार करून शक्यतोंपर्यंत घरांत बसायचें ठरवलें. पण पोरें मात्र भारी अचपळ! साऱ्या मुलखाची तडफड आणि मस्ती त्यांच्या आंगांत भरली होती. उद्योग नसला तर निदान उपद्व्याप तरी करावासा त्यांना वाटे. उन्हातान्हाची त्यांना कधीं खातरही नसायची! हवापाण्याची कसली का कडक लहर असेना, मोकळ्यांत जाऊन हुंदडल्याशिवाय त्यांना चैनच पडत नसे. कांपविणारी थंडी पडली तर तीं त्या थंडीलाच मिठ्या मारायला धावत आणि भाजणारें उन्ह असलें तर तीं त्या उन्हाशींच खेळ मांडीत! मोठीं माणसें पंख्याखालीं शांतपणें वाचीत असलीं, नाहीं तर त्यांचा डोळा लागला किंवा गप्पांत तीं गुंगून गेलीं, कीं मुलें त्यांची नजर चुकवून केव्हांच पसार होत आणि दूर मैदानांत जाऊन कसला तरी खेळ मांडीत, नाहीं तर

सरसर माकडासारखीं निंबाच्या झाडावर चढून जात, किंवा मोटेवर चढून धडाधड विहिरींत उड्या घेत. ! येथून तेथून सगळा अवखळपणा आणि पोरखेळ ! प्रकृतीची पर्वा नाहीं कीं जिवाची तमा नाहीं ! डोक्याचा उपयोग पोरांनीं कधीं केलाच असेल तर तो कोलांट्या मारायला ! बाकी सारा हातींपायीं कारभार ! पोरांच्या मागें "अरे–अरे" करून धावतां धावतां आणि त्यांना धपाटे घालून घराच्या चार भिंतींआड दडपून ठेवतां ठेवतां वडीलधाऱ्यांच्या नाकीं अगदीं नऊ येत.

हवापाण्यांत थोडाही बदल झाला कीं मोठीं माणसें त्या हवापाण्याला घाबरून जात आणि लहान पोरें मोठ्या माणसांच्या रखवालदारीनें जेरीस येत ! त्यांत यंदा हा असा जगावेगळा उन्हाळा पडला ! उन्हाळ्यापेक्षा पोरांना वडील माणसांचा ताप असह्य झाला होता ! घराबाहेर पाऊल टाकायची कांहीं त्यांना कोणी सोय ठेवली नव्हती. पोरांच्या खोड्यांकडे एरव्हीं कानाडोळा करून त्यांना पाठीशीं घालणाऱ्या रमाबाईनीं आपला आसरा आतां तोडला. दादा त्यांची बखोटी धरून त्यांना घरांत डांबूं लागला आणि नानाकाकांनीं तर अगदीं कहरच केला ! हिंवाळ्यांत थंडी असते म्हणून पोरांनीं बाहेर जाऊं नये, पावसाळ्यांत पाऊस असतो म्हणून त्यांनीं बाहेर फिरूं नये आणि उन्हाळ्यांत उन्ह तापतें म्हणून अष्टौप्रहर त्यांनीं घरांत बसावें ! नुसतें घरांत बसावें एवढेंच नव्हे, तर पुढच्या इयत्तेच्या पुस्तकांत डोकें खुपसून घरांत बसावें ! नानाकाकांच्या तर्कशास्त्रापुढें पोरें अगदीं हवालदील झालीं होतीं. तशांत यंदा हा असा उन्हाळा पडलेला ! पोरांना वाटे, 'खरंच, कधीं संपणार हा उन्हाळा ?'

नानाकाकांना मात्र उन्हाळा वरदानासारखा वाटला. नानाकाका बाबांचे बाबा होते आणि मुलांचे आजोबा होते. बाबा त्यांना नानाकाका म्हणत, म्हणून मुलेंही त्यांना नानाकाका म्हणत. नानाकाकांना मुलें आवडत नव्हतीं आणि मुलांना नानाकाका आवडत नव्हते ! नानाकाकांचा तो चुरगळलेल्या कागदासारखा चेहेरा, त्या लोंबणाऱ्या भुवया, तो चिरचिरा म्हातारा आवाज आणि तें पथ्यपाणी ! राम–राम— ! चिंचा, कैऱ्या, बोरें ! किती सुंदर वस्तु ! पोरांच्या तोंडाला नुसतें पाणी सुटायचें आणि नानांना त्यांच्या नुसत्या नांवानेंच पडसें व्हायचें आणि खोकल्याची ढास लागायची !

चिंचाकैऱ्यांची जर ही गत, तर झाडावर चढणें, उन्हांत धावणें, विहिरींत कुदणें,—गोष्ट कशाला ! मस्तीनें मुसमुसून धावपळ करणारीं आणि हाताला लागेल तें तोंडांत कोंबणारीं कार्टीं पाहिलीं, कीं नानाकाकांच्या आंगाचा नुसता तिळपापड उडे—गुडध्यांत माना खुपसून दडपून ठेवलं पाहिजे कारट्यांना ! मारे थोबाडून काढलं पाहिजे ! मस्तवाल शिंचीं ! [illegible]
नानाकाकांच्या ठरलेल्या आरोळ्या !

—कारट्यांनो ! मरायचं आहे का ?
—कारट्यांनो ! तंगडी तुटेल ना !
—होतां कीं नाहीं घरांत ? कीं येऊं मी आतां ?

नानाकाकांच्या पायाला गरम बँडेज आणि वात सदाचाच लागलेला होता, म्हणून मुलांच्या मागें धावत येण्याची धमकी त्यांना कधींच खरी करतां येत नसे. मुलांना हें माहीत होतें; नानाकाकांनाही हें माहीत होतें. मुलांना हें माहीत आहे ह्या कल्पनेनें नानाकाका जास्तच दांतओठ खात आणि नानाकाकांना हें माहीत आहे, ह्या कल्पनेमुळें हाताच्या टप्प्याबाहेर धावत गेल्यावर मुलें दांत विचकून खिदळत. पोरें तशीं कांहीं वाईट नव्हतीं. रमाबाई कधीमधीं ओरडल्या तर तीं मान खालीं घालीत. दादानें सटीं सहामाशीं रपाटा घातला तरी तीं त्याच्याभोवतीं गोळा होत. पण नानाकाका ? अष्टौप्रहर घरांत खुरडून सदा मुलांच्या मागावर असणारे नानाकाका मात्र त्यांना अगदीं आवडत नव्हते ! त्यांचें तें बँडेज, खोकला, तें तस्त, तो तेलाचा वास, ती मळकट आरामखुर्ची—कांहीं कांहीं त्यांना पसंत नसे. आणि नानाकाकाही पोरांचा एखाद्या सूडकऱ्यासारखा राग करीत. मुलांच्या चेहेऱ्यावर तांबडा गोरा रंग अगदीं मावत नव्हता आणि नानांच्या निबर तोंडावर जळक्या गोवरीची राखुंडी अवकळा पसरली होती.पोरांचीं वाढतीं शरीरें एखाद्या हिरव्या वेतासारखीं जागोजाग लवत होतीं आणि नानांच्या हाडांचीं मात्र वाळकीं लाकडें बनलीं होतीं. नानांचे डोळे एखाद्या डबक्यासारखे गढूळ आणि खोल होते, तर पोरांचे डोळे नितळ पाण्यानें कांठोकांठ भरून लकाकत होते. सगळें जग पचवण्याइतकी भूक पोरांच्या पोटांत होती, तर नानांच्या पोटांत नुसत्या त्या देखाव्यानेंच कळा उठत ! मुलें समोर असलीं कीं त्यांना डोळ्यांपुढें पाहून नाना चिरचिर करायचे आणि तीं डोळ्यांसमोर नसलीं,

कीं आरामखुर्चीवर कण्हत पडलेले नाना, त्यांच्या कोठें तरी चाललेल्या खेळाच्या कल्पनेनें बेभान व्हायचे! छेः छेः! नानाकाकांना मुलांचें कांहींच आवडत नव्हतें आणि मुलांनाही त्यांचें कांहीं आवडत नव्हतें! आतां यंदाच्या ह्या विलक्षण उन्हाळ्याचें पाहा ना. हा उन्हाळा मुलांना एखाद्या शत्रूसारखा वाटत होता. त्यांना सारखें घरांत माना दुमडून बसावें लागायचें! जरा कोठें हातपाय हालवूं म्हटलें तर कोणीतरी खेकसून हातांत पाटी, पेन्सिल देणार! मोठ्या माणसांचीं सदा बोलणीं, नानाकाकांचे रपाटे आणि त्यांचा नको असलेला सहवास! ह्या साऱ्या गोष्टी ह्या उन्हाळ्यानें पोरांच्या नशिबीं आणल्या!

नानाकाकांना मात्र यंदाचा जादा उन्हाळा फारच मानवला. त्यांनीं बँडेज सोडून त्याच्या गुंडाळ्या केल्या आणि त्या पेटींत ठेवून दिल्या (त्या गंपूला ठेवाव्या लागल्या! शीः!). पायाला दिवसांतून तीनदा तेल चोळायचें त्यांनीं आतां सोडून दिलें. त्यांचे गुडघे आतां कमी दुखूं लागले. कफ कोरडा झाला. खोकल्याला उतार पडला. आणि उन्हाच्या निमित्तानें घरांत डांबलेल्या पोरांचे कान त्यांच्या हातांत आतां सहज सापडूं लागले. पुढच्या वर्गाचा अभ्यास घेण्याच्या निमित्तानें काठीचा उपयोग धोंडूच्या पाठीवर सर्रास करतां येऊं लागला. (विद्रकल्याणी कार्टा! वेडावून दाखवतो काय?) दुरून दुरून वर्षभर खोड्या आणि चेष्टा करणारीं कार्टीं बरीं आतां आयतीं हातांत सापडलीं! कांपणाऱ्या हातांनीं पोरांचे कोवळे कान नानाकाका आतां रोज एखाद्या घड्याळाच्या किल्लीसारखे फिरवूं लागले! धोंडू, गोपू, दिन्या, चंपी—अर्वाच्य पोरटीं. पण आतां तीं सुद्धा उन्हाळा आणि आजोबा ह्यांच्या जाचानें अगदीं गाय होऊन गेलीं! त्यांना वाटूं लागलें, कीं सुट्टी नको, आइस्क्रीम नको, मास्तर चालतील, शाळा चालेल, पण आतां बस्स झाला हा उन्हाळा आणि हें नानाकाकांचें रोज रडविणारें राज्य! त्या वाढत्या उन्हाळ्यांत नानाकाकांची प्रकृति सुधारूं लागली आणि पोरांचा नूर पार उतरून गेला! एवढीं पुंड पोरें पण तीं आतां अगदीं दीन होऊन गेलीं! कधीं बसली नव्हती, अशी नानाकाकांची धास्ती त्यांना आतां बसली! नानाकाकांच्या हातांतला जोर दररोज वाढत होता, आणि पोरांनीं मात्र माना टाकल्या होत्या!

—बापरे ! काय हा उन्हाळा !
हा कधीं संपणार आतां ?

■ ■ ■

—जून ! मृग लागला !

आज कोठें इतक्या दिवसांनंतर भुईवर भरलेल्या आकाशाच्या ओल्या सावल्या फिरूं लागल्या. दाही दिशांना पेटलेली आग एकदम मंदावून दमट झाली. पेटत्या वाऱ्याच्या शुष्कतेला शीतळाई आली. जेथून निखारे गळत होते तेथून पाण्याचे फवारे उडण्याचीं शुभ लक्षणें दिसूं लागलीं.

आभाळांत एकाकीपणें ओरडत फिरणाऱ्या त्या घारीच्या जोडीला आतां अनेक पांखरांचे थवे लोटले. पिंजऱ्यांत डोळ्यांवर कातडी ओढून आळसत झोपलेल्या पोपटानें आपले डोळे व तोंड उघडलें आणि परत वाचाळपणाला सुरुवात केली. न्हाणीघराचा गार आडोसा सोडून मोत्या मैदानांत चौखूर धावूं लागला. बंदिस्त घरांचीं खिडक्या दारें भराभर मोकळीं झालीं. तापून रखरखलेल्या भुईवर मृगाच्या अपेक्षेचा आनंद दिसूं लागला !

वारा सुटला ! आजचा वारा गरम आणि रखरखीत नव्हता; तर कसा गार गार आणि मऊ मऊ होता आजचा वारा ! दमून पेंगलेल्या साऱ्या झाडांना त्या थंड वाऱ्यानें जागें केलें. उन्हामुळें शोष पडलेला वारा आतां कोठून तरी भरपूर पाणी पिऊन आला होता आणि शीळ घालीत सैरावैरा धावत होता. ‘मृग आला, मृग आला–उठा–!’ वारा धावपळ करून साऱ्यांना सांगत होता.

—जमिनीवर निपचित् पडून राहिलेली धूळ आतां आकाशांत उडूं लागली. त्यांत काड्या मिसळल्या, कागदाचे कपटे–पांखरांचीं पिसें ! वर ढगांनीं छत्र्या घेऊन जमावानें मिरवणूक काढली !

—आणि मग आवाज झाला ! ‘गुड्डम् !’ आभाळांतली म्हातारी हरभरे दळूं लागली ! ओहो ! किती दिवसांनंतर आज हा आवाज परत ऐकूं आला ! ‘गड्ड्–गुड्डम् !’ उन्हाळा संपला ! उन्हाळा संपला ! पावसाळ्याची पहिली सलामी झाली. वरुणराजाची द्वाही फिरली. मृगराजाच्या गडगडणाऱ्या रथचक्राचे पडसाद घुमूं लागले ! ग्रीष्माचा ताप बंद ! आतां

पंख्याचा कृत्रिम वारा बंद! आतां बर्फाचा खोटा थंडोसा बंद! आतां खसताट्यांची खोटी सावली बंद!

आतां खरा वारा आला. आतां देवाघरचें खरें खरें गार गार पाणी आलें. थंड थंड सावल्या पडल्या! ह्या पावसाळयाच्या सावल्या आहेत! ही उन्हाळयाची अखेर आहे—फार लांबलेल्या उन्हाळयाची ही अखेर आहे! —'गुडुम्–गुड्ड्ड्–गुडुम्!!' हें पोरांना पावसाळयाचें आमंत्रण आहे. पावसाळी वाऱ्यांचें आमंत्रण आहे. गरजणाऱ्या मेघांचें आमंत्रण आहे. लवलवणाऱ्या विजांचें आमंत्रण आहे. धुंदकारलेल्या दिशांचें आमंत्रण आहे! गर्जना–प्रकाश–वर्षाव!

—अहाहा! वारा किती गार आहे! आणि नुसता गारच नव्हे, तर किती जोराचा आहे! वाटतें, उन्हाळयाच्या घामानें शेदवलेले सारे कपडे दूर फेकून द्यावेत, आणि ह्या वेगवान् वाऱ्याच्या झोतांत उघडें होऊन स्नान करावें!

उन्हाळयाचा आळस, उन्हाळयाचें औदास्य, उन्हाळयाचें मालीन्य, सारीं गाळून टाकावींत! कोठला कोठला उत्साह, कोठला कोठला सुवास आणि कोठलें कोठलें जीवन आहे ह्या भरदार, दमदार पावसाळी वाऱ्यांत! पोरांच्या एखाद्या टोळीसारखा दंगेखोर आणि रंगेल आहे हा वारा!

—सूं ऽऽ – सूं ऽऽ सळ्ळ्!
—गुडुम् – गुडुम् – स्विश्—!!

झाडांचे शेंडे हालूं लागले. दारें खिडक्या हादरूं लागलीं. सर्वत्र हालचाल–सर्वत्र चेतना–सर्वत्र गति! आणि ह्या वेळीं...

  

पोरांचें भयभीत कोंडाळें नानाकाकांच्या भोवतीं डोळे विस्फारून बसलें होतें. काकांचा एका बाजूनें दोरी बांधलेला चष्मा त्यांच्या कपाळावर विसावत होता. थरथरत्या हातांनीं त्यांनीं साऱ्यांचे कान आळीपाळीनें लाल करून सोडले. पोरांच्या गालांवर आसवांचे ओघळ वाहून वाळले होते. मधून मधून त्यांचीं मनगटें नाकाखालून फिरत होतीं. धोंडू, गोप्या, दिनू, चंपी–सारींच पोरें अगदीं अवघडून गेलीं होतीं. साऱ्यांचे जीव अंबून गेले. बाहेर अंधारून आलें,

आंत जास्तच अंधारलें होतें. रडव्या आवाजांत पोरें काकांनीं दिलेल्या संथा घोकत होतीं.

" उमाळ्यावरी येतसे सूर्य जेव्हां... ! "
" शुद्ध कसें बोलावें आणि शुद्ध कसें लिहावें... ! "
" ऋषीचा ऋ–ऋषीचा ऋ... ! "
" M–A–N म्यान म्हणजे माणूस !
C–A–T क्याट म्हणजे मांजर,
Cat क्याट म्हणजे मांजर ऽऽ... ! "

पोरांचे आवाज विव्हळण्यासारखे येत होते. आज दुपारपासून नानांनीं साऱ्या पोरांना अगदीं बेदम शिकवण्याचा धोशा लावला होता. खुद्द नानाकाकांचें शिक्षण M-A-N मॅन म्हणजे माणूस–ह्या पलीकडे फारसें गेलेलें नव्हतें. मराठी चौथींत गेलेला धोंड्या, इंग्रजी पहिलींत गेलेला दिन्या, मराठी दुसरींतला गोप्या, आणि बालवर्गांतली चंपी, ह्या साऱ्यांना त्यांनीं वेठीला धरलें होतें, ह्यांत विशेष नवलाची गोष्ट नव्हती. पण यंदाच मॅट्रिक पास झालेल्या दादाला सुद्धा त्यांनीं कांहीं तरी वाचीत बसण्याचा हुकूम सोडायला कमी केलें नाहीं ! एरव्हीं नानाकाकांना फारशी दाद न देणारा दादा सुद्धा आज मिस्किलपणें गालांतून जीभ फिरवीत पोरांच्या सुरांत सूर मिळवून नवीनच घेतलेल्या पुस्तकांतून कविता वाचीत होता –

*"Crabbed age and youth,*
*Cannot live together;*
*Youth is full of pleasance,*
*Age is full of care;*
...............................
...............................
*Youth is full of sport,*
*Age's breath is short;*
*Youth is nimble, age is lame,*
*Youth is hot and bold,*
*Age is weak and cold,*
*Youth is wild and age is tame,*
*Crabbed age and youth......!"*

ती अंधारलेली खोली विसंवादी सुरांच्या मिश्रणानें सारखी कांपत होती. वठणीवर आणलेल्या पोरट्यांच्या वाकलेल्या मस्तकांवरून नानाकाका मोठ्या समाधानानें नजर फिरवीत होते. त्यांच्या पायांशीं त्यांची दमलेली काठी आडवी पडली होती. केवळ मानसिक समाधानासाठीं मधूनच ते हात उगारून एखादी षष्ठीप्रत्ययान्त शिवी हासडीत तेव्हां त्यांच्या आंगरख्यावर मुखरसाचे चारदोन नवे डाग ओघळत.

पलीकडच्या खोलींत रमाबाई कांहीं तरी पुटपुटत भांडीं आपटीत होत्या. "पोरांची जात" "दुस्वास" आणि "राक्षस" ह्या तीन शब्दांचा त्या वारंवार उच्चार करीत. नानांची श्रवणशक्ति मंदावलेली होती, हेंच त्यांच्या व त्यांच्या सुनेच्याही दृष्टीनें ठीक होतें. नाहीं तर मुलांच्या बाळसेदार आरोग्याला मरवडा घालून त्यांना "दांडगेश्वर" म्हणणारा माणूस स्वतःच "उलथून" जायला पाहिजे, असें आपल्या सुनेचें मत असल्याचा शोध नानांना लागला असता आणि नानांना मुलांना शिकवण्यापेक्षां मुलांना मारण्याचीच हौस जास्त आहे, असाही रमाबाईंचा प्रामाणिक विश्वास असल्याचें त्यांच्या ध्यानांत आलें असतें. नानांनीं आज दुपारभर गाजवलेल्या कर्तबगारीवरूनच सांगायचें, तर त्यांनीं आज मुलांना जितकें शिकवलें त्यापेक्षां मारलेंच जास्त, ही गोष्ट अगदीं खरी होती. पोरें जेवून आंचवतात न आंचवतात तोंच नानांनीं त्यांच्यावर झडप घातली आणि मग...!

—घड्याळाचे कांटे एकापासून फिरत साडेपांचावर आले!
—गिरण्यांचे भोंगे वाजूं लागले!
—नळाच्या प्रसूतिवेदनांचा फटक्–हुर्र्–फटक् असा चमत्कारिक आवाज सुरू झाला!

तरी नानाकाकांचा मुलांना शिकवण्याचा सपाटा चालूच होता. आतां मात्र पोरांचा अगदीं गळाठा उडाला. सारे डोळे पाण्यावर आले! "M–A–N म्यान–म्हणजे माकड–अं–माणूस–" असा प्रकार सुरू झाला. अगदीं तारस्वरांत पाठान्तर करणारे सूर दमून दमून पुटपुटण्याच्या पट्टींत लागले. मधून मधून पोरांच्या नजरा खोलीबाहेर जाणाऱ्या प्रत्येक दारावर आशाळूपणें फिरत. पण त्यांना कोणी त्राता दिसेना!

पक्के साडे चार घंटे झाले! घरांत बसायची नानांना सवयच होती. एवढेंच काय, पण घरांतल्या सुद्धा एका विशिष्ट खोलींत आणि एका विशिष्ट कोपऱ्यांत ते घंटोगणती बसून राहात! मुलें मार खायला भीत नव्हतीं पण त्या बैठ्या शिक्षेनें त्यांना अगदीं रंजीस आणलें. शत्रुपक्षाची ही दाणादाण नानांना ओळखली. मुलांना मारून मारून त्यांचे हात आतां दुखूं लागले होते. तंबाकूचा नवा बार भरण्यासाठीं त्यांनीं हातांतलें पुस्तक मांडीवर पालथें ठेवलें, आणि बोबड्या आवाजांत पण संतुष्ट स्वरांत ते गरजले,—

"हां! मग? कुठवर आलं?"

सारे आवाज एकदम थांबले. 'M-A-N–म्यान–म्हणजे माणूस' म्हणून स्वतःला मरगळलेल्या सुरांत बजावीत बसणारा आवाज देखील स्तब्ध झाला. नानांना सुट्टी मागायची संधि असली तर ती हीच होती. नानांच्या खुणा पोरांना ठाऊक होत्या. कोणाला मारायचें असलें, तर प्रथम ते बोटांतली आंगठी एकदा फिरवीत. त्यांना विशेष कांहीं म्हणायचें नसलें तर ते "हॉ–मग?" म्हणून उगीचच प्रश्न करीत. नानांनीं आतां "हॉ–मग?" केलें आणि सारे डोळे सुट्टीसाठीं काकुळतीनें त्यांच्याकडे लागले.

संध्याकाळ झाली होती. बाहेर कावळ्यांनीं ओरडून ओरडून गर्गशा घातला होता. गुरांच्या गळ्यांतल्या घंटांचे आवाज ऐकूं येत होते. खिडकीच्या कांचेंतून पोरांना बाहेरच्या सुंदर जगाचा एक छोटासा तुकडा दिसत होता. पोरांचा आत्मा अगदीं अस्वस्थ झाला होता. तेवढ्यांत वाऱ्याचा एक मोठा झोत खोलींत शिरला. तावदानें वाजलीं. खिडक्यांचे पडदे फडफडले आणि नानाकाकांच्या मांडीवरचें पुस्तक दूर उडालें. चटकन् नानाकाका स्वतः उठले. त्यांना उठतांना आज मुळींच प्रयास पडले नाहींत. न कण्हतां पुस्तक उचलण्यासाठीं ते खालीं वाकले. वाऱ्याचा नवा झोत आला. दांडीवरचे कपडे एखाद्या निशाणासारखे हालले. भिंतीवर टांगलेल्या पंचांगानें गिरक्या घेतल्या. नानाकाकांचें पुस्तक आणखी कांहीं फूट पलीकडे उडालें. नानाकाकांनीं जवळ जवळ उडी मारून तें पुस्तक पकडलें. त्यांचे गुडघे दुखले नाहींत. त्यांना खोकल्याची उबळ आली नाहीं. घशांत कफ दाटला नाहीं. पाठींत उसण भरली नाहीं. पुस्तक घेऊन नानाकाका परत खुर्चीवर जाऊन बसले व हसले!! आणि अपरिचित अशा मृदु स्वरांत ते म्हणाले—

" काय रे मुलांनो, काय म्हणालों मी ? "

दिन्यानें धोंडूला ढोसलें, धोंडूनें गोप्याला ढोसलें आणि गोपू चंपीला कोपरानें सारखा टोचीत राहिला. नानाकाकांचा नूर मवाळ पडला होता, तरी पण काय नेम घ्या ? मध्यस्थाचें काम करायचें असलें तर तें छोट्या चंपूनेंच करायला पाहिजे असा त्या अर्धवर्तुळांत फिरलेल्या कोपरखळ्यांचा अर्थ होता. नानांच्या सपाट्यांतून वांचली, तर गरीब चंपीच वांचण्याचा थोडाबहुत संभव होता !

" धोंड्या-दिन्या-गोप्या-चंपे... " नानाकाका पिचक्या स्वरांत नामावळी वाचूं लागले.

वाऱ्याचा आणखी एक झोत आला, आणखी एक–आणखी एक... !

पोरांच्या हातांतल्या वह्या चौफेर उडाल्या.

मेघ जोरजोरानें गडगडूं लागले.

पोरांच्या कल्पनेसमोर सारें परिस्तान नाचत होतें ! कागदाच्या नावा, मृगाचे किडे, इंद्राचें धनुष्य, आभाळांतली म्हातारी !

" नानाकाका, आम्हांला सुट्टी द्या ना हो आतां ! आम्हीं जरा खेळतों ना बाहेर जाऊन ! "

खेळण्याचा मोह आणि गोप्याच्या कोपरखळ्या दोन्ही अनावर झाल्यामुळें अखेर तोंडांत जाणारे केस आवरीत छोटी चंपी विचारती झाली. चंपी बोलली आणि " सूं ऽ ऽ " असा आवाज करून पोरांनीं नाकाखालून जिभा फिरविल्या. अगदीं आणीबाणीचा निकाल ऐकण्यासाठीं करावेत तसे त्यांचे चेहेरे झाले. चंपूचे शब्द नानांनीं ऐकले, आणि तरीही त्यांच्या तोंडून अपशब्द आला नाहीं ! आभाळांत झपाट्यानें उमटत गेलेल्या इंद्रधनुष्याचा एक भाग खिडकींतून दिसत होता. ओथंबलेल्या आकाशाच्या पार्श्वभूमीवरून उडत गेलेले कांहीं बगळे पांढऱ्या फुलांच्या अस्मानांत उधळलेल्या ओंजळीसारखे दिसले. नानाकाका आपल्या धुरकटलेल्या डोळ्यांनीं कोठेंतरी दूर पाहात होते. ते निश्चित कोठें पाहात होते कोण जाणे. कदाचित् पासष्ट वर्षांपूर्वी पावसांत मनमुराद गिरक्या घेणाऱ्या एका सडपातळ मुलाच्या कोवळ्या आकृतीकडे ते पाहात असतील. नानाकाका असें काय

पाहाताहेत तें मुलांना कळेना. नानाकाकांच्या उत्तराची वाट पाहात त्यांनीं आपले दम रोखून घेतले.

पुन्हा एकदा सोसाटत वारा आला ! पुन्हा एकदा गरजलें ! दूर कोठें तरी खिळलेली नानाकाकांची झिलई उडालेली नजर चंपूपासून धोंडूपर्यंत साऱ्यांच्या चेहेऱ्यांवरून फिरली आणि ते खरखरणाऱ्या आवाजांत म्हणाले–

"चंपे, कुणाला सुट्टी पाहिजे आहे रे ?"

"मला नानाकाका !" अर्धवट उठत चंपी म्हणाली.

"आणखी कुणा कुणाला खेळायला जायचंय् रे ?"

"मला नानाकाका !" गोप्यानें छातीवर हात मारला.

"आणखी मला सुद्धां !" पाताळांत गेलेला स्वर आभाळांत चढवीत विन्या म्हणाला.

"आणखी मला !"

"आम्हांला सगळ्यांनाच नानाकाका !" लाडावून केस खात चंपूनें आतां ठासून सांगितलें !

"मग माझी खुर्ची कोण नेऊन ठेवतो पडवींत ? कोण बरं ? गोपू तूं ? धोंडू तूं ? दिन्या... ?"

इतकें मार्दव पोरांनीं नानाकाकांच्या स्वरांत विरळाच ऐकलें होतें. त्या मार्दवानें मुलांना एकदम जिंकलें. नानाकाकांचे शंभर अपराध त्यांनीं आतां माफ केले. नुसती खुर्ची पडवींत उचलून ठेवण्याची गोष्ट काय, पण खुद्द नानाकाकांसकट त्या खुर्चीची पोरांनीं आतां वाजत मिरवणूक काढली असती. मोकळ्या सुटलेल्या त्या वानरसेनेनें भराभर नानांची खुर्ची, काठी, चष्मा, पोथी, सारें कांहीं पडवींत नेऊन ठेवलें. एवढेंच काय पण नानाकाकांचेंही बोट धरून मुलांनीं त्यांना बाहेर आणून बसवलें. नानाकाकांनीं आंगाभोवतीं शाल लपेटली, आणि टापशी गुंडाळून ते आंगणांतल्या किलबिलत्या थव्याकडे अनिमिष डोळ्यांनीं पाहूं लागले.

■ ■ ■

आतांपर्यंत दाबून ठेवलेला पोरांचा उत्साह आतां उसळया घेत बाहेर आला. तीं नुसतीं नाचत सुटलीं. आणि अगदीं भुईशीं लोंबलेल्या आभाळाला तळहातांनीं पालवत चक्राकार फेर धरून तीं पावसाला आळवूं लागलीं,

"ये रे ये रे पावसा!
ये रे ये रे पावसा!
ये रे ये रे पावसा!"

अनेक कोवळया, लवचिक, कर्कश, मधुर कंठांतून संवादी सूर आकाशाच्या दिशेनें चढूं लागले—

"तुला देतों पैसा!
तुला देतों पैसा!
तुला देतों पैसा!"

छेः! मुलांना थकवा कसा तो माहीत नव्हता. त्यांचे आवाज कसल्या तरी विलक्षण शक्तीनें कांठोकांठ भरलेले होते. प्रांगणाचें माप आपल्या मुक्त कोलाहलानें त्यांनीं शिगोशीग भरून टाकलें. त्यांच्या कोलाहलमय शब्दांत अर्थ नव्हता, पण प्राण होते. मध्येंच वाऱ्याचा अतिशय वेगवान झोत येई व पोरांचे उडत्या भाल्यासारखे टोकदार आवाज बोथटून मध्येंच टिपले जात. पोरांच्या नाकांत, तोंडांत, कानांत, वारा भरत होता. तीं सारीं वाऱ्याच्या तालावर नाचत होतीं. तीं जणूं वायुरूप झालीं होतीं. पृथ्वीवर त्यांचे पाय टेकेनात! वाऱ्याच्या गतीनें तीं चक्राकार फेर घेऊं लागलीं. त्यांचे आकार अस्पष्ट झाले! जणूं वाऱ्यावर आतां नुसते फुलांचे गोल गुच्छ उडत होते! जणूं त्यांचा सूर वाऱ्याचा आणि वाऱ्याचा सूर त्यांचा होता. जणूं त्यांची चेतना वाऱ्याची व वाऱ्याची चेतना त्यांची होती! जणूं त्यांचें गाणें वारा व वाऱ्याचें गाणें तीं गात होतीं!

"ये रे ये रे पावसा!
ये रे ये रे पावसा!
तुला देतों पैसा!
तुला देतों पैसा!"

आभाळांत मुंग्यांचीं अनंत वारुळें मोकळीं सुटलीं. लखूकन् विजा डोकावूं लागल्या. मेघांनीं सहस्रावधि टाळयांचा कडकडाट केला. त्या बालगीताचा जणूं

त्यांना अनावर मोह वाटला! वाऱ्यानेंही आतां नुसता हुतुतू मांडला! सारीं झाडें खळखळा हलूं लागलीं. वेली बेभान होऊन माना डोलवूं लागल्या. भुईवरील धूळ अस्मानांतील ओल्या धुक्यास भेटावयास गेली! सगळीकडे हालचाल, सगळीकडे मस्ती, सर्वत्र धुंदी! आकाश धुंद, झाडें धुंद, दिशा धुंद, मुलें धुंद!

तो सारा देखावा नानाकाका बांधल्या नजरेनें पाहात होते. त्यांचें मन कोठें होतें कोणास ठाऊक! पोरें बेभानपणें नाचत होतीं. त्यांच्या चेहेऱ्यांवर रक्त उसळलें होतें. नकळत नानाकाकांचा हात थरथरत स्वतःच्या तोंडावरून फिरला. तेथें त्यांना जरड खुंट आणि मृत कातडीचा स्पर्श झाला. त्यांची दृष्टि खालीं फिरत गेली. शुष्क, निस्तेज आणि जर्जर अशा कोण्या शरीराचें त्यांच्या डोळ्यांना दर्शन झालें. कांटेकुटे आणि दगडगोटे ह्यांनीं भरलेली ओसाडी पार करून कोठल्या तरी हिरव्याचार राईंत भटकणाऱ्या त्यांच्या कल्पनेला तें दुर्दर्शन असह्य वाटलें.

वाऱ्याची नवी लाट घोंघावत आली. समोरच्या झाडांचीं पानें शेकड्यांनीं गळलीं आणि इतस्ततः उधळलीं गेलीं! पोरांच्या स्वैर संगीताला ऐन भरती आली होती. मेघांच्या पोटांतील पाण्याचा प्रकाश सर्वत्र पडला. वातावरणास एक प्रकारचा धूसर, अंधुक, स्वप्नमय रंग चढला. पोरांनीं आनंदाचे चीत्कार करीत आंगावरील कपडे काढून फेकले, व भान गेल्याप्रमाणें नाचत तीं ओरडूं लागलीं,

“पैसा झाला खोटा!
पैसा झाला खोटा!
पैसा झाला खोटा!”

नानाकाका तन्मयतेनें पाहात होते व ऐकत होते. मूर्तिमंत जीवन त्यांच्या क्षीण नेत्रांसमोर गीतमय गिरक्या घेत होतें. निसर्गाशीं आणि वादळाशीं खेळत बसणारें तें जीवन होतें. त्या जीवनांत वर्षाऋतूची सफलता होती, वायूचा वेग होता, विजेचा प्रकाश होता, आणि धरित्रीची सहनशीलता होती. पथ्य, औषध, कंप, कातरता ह्यांना त्या जीवनांत अवसर नव्हता. अहा! किती मस्त, किती बेफाम, किती सुंदर!

दबलेल्या स्वरांत मेघ गुरगुरले, डोळे दिपविणारा प्रकाश फांकला, आणि बऱ्याच अंतरावर कडकडत आगीचा एक लोळ जमिनींत घुसला. नानाकाका जागच्या जागीं दचकले. पोरांनीं खिदळून टाळ्या पिटल्या. अंधार वाढत होता. त्या अंधारांत मेघराशींची काळोखी कालवली गेली. मुलांचीं शरीरें आतां दिसत नव्हतीं. जणूं तीं केवळ नादरूप झालीं होतीं,

" पैसा झाला खोटा
पैसा झाला खोटा
पैसा झाला खोटा
पाऊस आला मोठा ! ! "

टिपरघाईला आलेले मुलांचे आवाज अगदीं आभाळाला टेकले. वारे अधिकच ओलावले. पावसाचे थेंब टपटपूं लागले. प्रथम चुकार व मग शेकडों ! मुलांनीं एकच गोंगाट करून पुन्हा टाळ्या पिटल्या व आकाशाच्या दिशेनें आपल्या चोंची उघडल्या. तो मृगाचा आरंभ होता ! तो पाऊस पहिला होता ! तें वादळ पहिलें होतें ! ती उन्हाळ्याची अखेर होती !

" **गुड्डुम्–गुड्–गुड्–** " मेघ गरजले.
" **सों–स्विश्–सों–स्विश्–सूं–सूं–** " वारा वाहूं लागला.
" **तड्–तड्–तड्–तड्** " तीरांच्या वर्षावासारख्या पावसाच्या धारा सपसपत पडूं लागल्या.

  

पहिला पावसाळी वारा नानाकाकांच्या आंगाला झोंबला. पहिल्या पावसाचे ओले ओसाडे त्यांच्या आंगावर गेले. पाऊसवाऱ्याच्या त्या स्पर्शानें त्यांना हुडहुडी भरली आणि त्यांचें शरीर कांपूं लागलें. खोकल्याची नवी उबळ त्यांच्या घशांत उसळली. वाटलें, जणूं आतां आतडीं तुटतात ! त्यांच्या आंगभर एकदम चमक उठली आणि पाठींत उसण भरली, गुडघे दुखूं लागले, कंठांत पुन्हा कफाचा फास बसला. नानाकाकांचा जीव कासावीस झाला. पोरें अजूनही कोसळत्या पावसांत नाचत होतीं. त्यांच्या कोलाहलाला अद्याप खंड नव्हता. तो आवाज आतां नानाकाकांना असह्य वाटला. त्यांच्या कानशिलावरची शीर संतापानें तडतडूं लागली. त्यांचा आवाज

बदलला, त्यांची वृत्ति बदलली. थोड्या वेळापूर्वी फार मागें राहिलेल्या शैशवाच्या हिरवळीवर जाऊन नाचणाऱ्या त्यांच्या कल्पनेच्या गळयांत कोणीं तरी दोरखंड अडकवलें व तिला खेचीत पुन्हा काऱ्याकुऱ्यांच्या आणि दगडागोट्यांच्या जगांत आणून सोडलें. त्यांच्या दृष्टीपुढून पासष्ट वर्षांपूर्वी चक्राकार नाचणारा तो कोवळा पोरगा अदृश्य झाला आणि आतां तिथें एक विद्रूप म्हातारा खोकत उभा राहिला. नानाकाकांचें मस्तक अनामिक संतापानें झिणझिणलें. आंगणांत खेळणाऱ्या पोरांच्या थव्याकडे पिवळ्या हिरव्या डोळ्यांनीं पाहात ते विकृत स्वरांत ओरडले, "कारट्यांनो, होतां कीं नाहीं घरांत ? कीं मरायचं आहे न्यूमोनियानें ? बेअक्कल अवलाद ! फोडून काढलं पाहिजे एकेकाला !"

बोलतां बोलतां नानाकाकांना ठसका लागला. त्यांच्या गळयाची प्रत्येक शीर ताठ उभी झाली. सडसडणाऱ्या पावसाच्या आवाजांत नानांच्या खोकल्याचा आवाज विचित्रपणें मिसळला. मुलांचें गाणें थांबलें. खालीं माना घालून निथळत्या आंगानें तीं घरांत परतलीं !

मुलांनीं चिथावून दिलेला पाऊस मात्र आतां जास्तच जोरानें कोसळूं लागला !

# सार्थक

कोणाचें सुख कोठें गुंतलें असेल तें सांगणें मोठें कठीण आहे. जिवंत राहाण्यासाठीं माणूस नुसता कारणाला टेकलेला असतो. तें कारण वरवर पाहाणाऱ्याला शोधूनही सापडायचें नाहीं. वाळवंटांतही हिरवळ असते. ओसाड आडांतही एकटें दुकटें फूल उमलतें, आणि कुरूप बायकाही पावडरीच्या आधारावर आनंद मानतात. नाहीं तर वास्तविक पाहातां ज्यांनीं इहलोकास नम्रपणें मुजरा करून केव्हांच आत्महत्या करायला पाहिजे, त्यांचाच जगांत जगण्यासाठीं एवढा अट्टाहास चाललेला दिसता ना! बाहेरची दुनिया त्यांच्या लेखीं विस्तवानें फुलली असतां, मनाच्या मायानगरींत हे वीर एखाद्या शीतल कारंजाची कळ दाबतात, आणि आयुष्यावरचा आपला कब्जा कायम ठेवतात. जगण्यासाठीं कांहीं तरी कारण पाहिजे आणि जगायचें आहे, हेंच जगण्यासाठीं कारण! म्हणून सुखाचे आभास उत्पन्न होतात!

स्वरूपकुमार ऊर्फ महादेव ह्याच्या नांवानें वास्तविक पाहातां आतांपर्यंत एक सुंदरशी नक्षीदार समाधि बांधली जायला पाहिजे होती. निष्कारण वैराण आयुष्य लांबवीत आणि जगत बसला होता भला मनुष्य! कोणी सुख लांबवेल आणि भोगेल, कोणी झोप लांबवेल आणि भोगेल, पण ना जागृति ना निद्रा, ना बेहोष धुंदी ना नितळ नजर—असलें कांहीं तरी भकास, डोळे दुखवणारें जीवन लांबवत बसला होता हा प्राणी! चित्रगुप्ताला सुद्धा त्याच्या खात्यांत तीच तीच नोंद करतांना जांभया यायला लागल्या असतील. स्वरूपकुमार ऊर्फ महादेव माने ह्याची झगझगीत पाप किंवा झळझळीत पुण्य करण्याची मुळीं ऐपतच राहिली नव्हती. मरणाआधींच मेलेल्या त्या रखडत्या आयुष्यांत कसलें पाप आणि कसलें पुण्य? तीं दोन्ही करण्याच्या दृष्टींनीं पुरताच कफल्लक बनला होता तो! खालीं बसला तर कायमचा निजेल, असा टांग्याचा मरतुकडा घोडा, निव्वळ मागून चाकें ढकलतात, एवढ्यासाठींच तत्त्वज्ञासारखा चालत असतो. निव्वळ निमित्ताचें कारण! महादेवला मागून कोणतीं चाकें ढकलत होतीं, तें मात्र मला अजून मुळींच कळलें नव्हतें.

प्रो. मोऱ्यांनीं ' दि ग्रेट गोरिला सर्कस (ऑफ तासगॉंम!') काढली होती व नांवारूपाला आणली होती. प्रो. (प्राध्यापक?) मोऱ्यांनींच महादेवला

सनलाईट सोपच्या फेसांत बुचकळून आणि त्याच्या टाळूवर बाटलीभर तेल ओतून त्याचा 'स्वरूपकुमार' केला होता. आंगावरचीं रकटीं आणि खेड्यांत बसलेली धूळ झटकून त्यांनींच त्याला एका तपाच्या तालमींत शिक्षण आणि संस्कृति दिली व त्याचें तें लोकप्रिय मोटारसायकलवरचें काम संपल्यावर, काळया मखमलीच्या पोषाखांत कमरेच्या प्रत्येक कोनांत वाकून, दशदिशांना सलाम करायलाही त्यांनींच त्याला शिकवलें. आपल्या 'शंकर' घोड्यापेक्षांही ज्या अर्थी प्रोफेसरसाहेब आपणावर जास्त मेहनत व पैसा खर्च करीत आहेत त्या अर्थीं पुत्री चंपूच्या पिंजऱ्यांत आपणांस कायमचें बंद करण्याचा त्यांचा मनसुबा असावा, अशीही तेव्हां त्याला बळकट शंका होती. चंपू, जनावरें व जग ह्यांचा मुकाबला करण्याची योग्यता यावी म्हणून लहानपणीं प्रो. मोरे त्याला इतका झोडपीत, कीं सारा शिकारखाना गद्गद कंठानें अश्रु ढाळूं लागे. म्हणूनच मला वाटतें, आज महादेवच्या आंगांत एवढा कौतुकास्पद मख्खपणा मुरलेला दिसत आहे.

परंतु मनुष्य आणि परमेश्वर ह्यांच्या इच्छांची कांहीं अजब तेढ आहे. गुरगुरून शेपटी हापटणाऱ्या सिंह, वाघ वगैरे उद्धट मंडळीपासून तो तहत नुसत्या दांत दाखवून समाधान मानणाऱ्या माकडापर्यंत साऱ्यांशीं दैनिक घसट आटोपल्यावर बिल्ल्यांचा कोट उतरवून ठेवतांना महादेव चंपूला माणसाळविण्याचा प्रयत्न करीत आहे, त्याचे चार दोन बिल्ले लांबवून त्यांचे बिल्वर करण्याच्या इरेस पेटल्यामुळें ती आफ्रिकन सिंहिणीचे पवित्रे घेत आहे, मिशा पिकलेले प्रो. मोरे हा सारा वत्सल देखावा सस्मित दृष्टीनें निरखीत आहेत व महादेवच्या असूयेनें जळून खाक झालेला व्यवस्थापक पवार बंगाली वाघाच्या तोंडांत मान देऊन हाराकिरी करण्याच्या बेतांत आहे इत्यादि महादेवच्या मनांत त्या काळीं कित्येकदा घडून गेलेल्या घटना प्रत्यक्षांत येणें, परमेश्वरानें मनावर घेतलेंच असतें तर, तेवढें कांहीं अशक्य नव्हतें. परंतु अघटित घटनापटुत्वाची चटक लागलेल्या त्या जगन्नियंत्याची लहर कांहीं वेगळीच लागली. चाबकाच्या उपयोगाबाबत एके रात्रीं प्रो. मोरे आणि एक माथेफिरू चित्ता ह्यांच्यांत तीव्र तात्त्विक मतभेद झाला व त्या मतभेदांत तीव्रतर नखांची भर पडल्यामुळें प्रो. मोरे ऐरावत, उच्चैःश्रवा, तारनर्तकी मिस् रंभा आदींच्या स्वर्गीय सहवासासाठीं त्वरेनें निघून गेले.

येथून साराच रंग पालटला. जीव प्रो. मोऱ्यांचा गेला, पण बॅंडबाजा वाजल्याप्रमाणें ती बातमी सर्वत्र पसरली व तमाम रसिकांना स्वतःचें प्राणोत्क्रमण झाल्याचा भास होऊन गांवोगांव 'दि ग्रेट गोरिला सर्कस' (ऑफ तासगॉंम) चे तंबू रिकामे पडूं लागले. शिकारखान्यावर अवकळा पसरली. सिंह गाढवासारखे दिसूं लागले. हत्तीला डुकराची कळा आली. उंट आणि जिराफ ह्यांत ओळख काढणें कठीण झालें. माकडें माणसासारखीं दिसूं लागलीं. सर्कशीतील माणसांना देव दिसूं लागून त्यांची वासना घोड्यासमोरील चण्यावर जाऊं लागली. बदनामीपासून फारच दूर, मलाया बोर्निओकडे सर्कशीनें कूच केलें असतें, तर ती कदाचित् वांचलीही असती, पण पदरीं असलेलें अश्वदल, गजदल हा कांहीं खर्चाच्या आधुनिक वाहनांवर तोडगा नव्हता. आपल्या 'ओल्या व्यसनापायीं' प्रो. मोऱ्यांनीं गंगाजळी कोरडी पाडल्याचें निदर्शनास आलें होतें. त्यांतच शहरोशहरीं बोलके सिनेमे उपटले. इंग्रजी दुसऱ्या वर्गातील पोरांना सुद्धा सर्कशीच्या निम्मे दराचें आकर्षण वाटेनासें झालें.

'सर्कस—सर्कस' खेळण्याऐवजीं वाकडीं तिकडीं तोंडें करीत व माना वेळीत तीं गाऊं लागलीं. तोंडाला संगजिरें फासून डबलबारची नक्कल करीत असतां तंगडी मोडून घेण्याऐवजीं आतां द्वंद्वगीतें गाऊन इतरांचे कान फोडण्याची त्यांची तयारी झाली होती. शिकारखाना पाहाण्याऐवजीं नटांचे फोटो व सेल्युलॉईडचे तुकडे जमवण्याचा नवा आकर्षक छंद त्यांना आतां लागला. सर्कसवाल्यांचें मायपोट असणारा तरुण आधारस्तंभ अशा रीतीनें पार कोसळून पडला!

दिने दिने सर्कशींतले व्याघ्रसिंहादि सामिष आहार करणारे प्राणी गजसेनेकडे सतृष्ण नजरेनें पाहूं लागले. व्यवस्थापक पवार अस्वलाच्या केसांची, हस्तीदंतांची, वाघनखांची व सिंहाच्या चरबीची सुद्धा मनाशीं किंमत लावूं लागला. खेळाडूंच्या मखमली पोषाखावरील जर पार झडून गेली. तार—नर्तिका चपला हिचे जमिनीवरून चालतांनाही झोक जाऊं लागले. सायकलवस्ताद छोटू हा भाड्याच्या सायकलींचें दुकान काढल्यास कसें दिसेल ह्याचा विचार करूं लागला व अनवस्थाप्रसंगाची कमाल झाल्यावर एके सुप्रभातीं त्या थोर 'दि ग्रेट गोरिला सर्कस' चा प्रचंड गाशा सावकारांनीं अचानक व कायमचा

गुंडाळला! चंपूचें काय झालें, प्रतिस्पर्धी पवार कोठें गेला, चपला कोठें निसटली ह्याचा विचार करायला महादेव माने ह्याला अवकाश नव्हता. 'ग्रेट गोरिला' च्या अखेरच्या गोंधळांत त्याच्या हातीं कपिराज गोरिलाचें निवासस्थान असणारी राहुटी, खेळाची 'ट्रॅम्फ' मोटारसायकल व एक बुरणूस एवढ्या वस्तु लागल्या व त्या घेऊन तो पहिल्या रस्त्यानें पसार झाला. चंपूचा सर्कससम्राट रिंगमाष्टर होण्याचें महादेवचें स्वप्न येथंच संपलें!

■ ■ ■

किती दिवस चाललें होतें कोण जाणे! पण त्यानंतर त्याचें तें आयुष्य सुरू झालें, कीं ज्याला आयुष्य म्हणणें खरोखरच जिवावर येतें. तेंच तें आयुष्य, कीं जें एखाद्या मातीमोल नटाच्या किंवा उतारास लागलेल्या पण्यांगनेच्या नशिबीं येतें. इतक्या उशिरां दुसऱ्या कसल्या कसबांत शिरायची नालायकी महादेवच्याही अंगीं आली होती. आडांत पोहायला शिकलेला बेडूक आड आटला तरी तेथेंच शेवटीं वेदनेनें नाचत आणि ओरडत मरायचा! त्या प्रकाराला वाटेल तर कोणी खुशाल जलसा म्हणावें!

जवळ असलेल्या एकाच कलेचा महादेवनें आतां असाच जलसा सुरू केला. लहान लहान तालुक्याचीं गांवें पाहावींत, फडतूस शाळामास्तरांची अजीजी करावी, पोलीसांसमोर गुडघे टेकावेत आणि चार दिवस राहुटी ठोकून आपला तोच तो मोटरसायकलचा खेळ, गांव पाहून दोन ते चार पैशांत, पाहाण्याविषयीं लोकांचीं मनें वळवावींत. आज एक गांव, उद्यां दुसरा, परवां तिसरा आणि असाच टोक न दाखविणारा अखंड क्रम. भटकणें-भटकणें-भटकणें! मनाला भोवळ येईल इतकें! चैतन्य हरपून जाईल इतकें! तेंच कपाळ रोज नव्या धन्याच्या पायांवर लोटायचें आणि तेंही अक्षरशः फक्त जेमतेमच पोटाला मिळावें म्हणून!

एका प्रचंड तंबूंत हजारांच्या जमावाला काळी मखमल घालून ऐटबाज प्रणाम करणाऱ्या स्वरूपकुमारची आज ही अवस्था होती. प्रो. मोऱ्यांचा जावई म्हणून ज्याचें नांव पडलें होतें, तो आज; सवलतीच्या एक पैसा दरांत पोरांना खेळाला पाठवा, म्हणून मळकट मास्तरांच्या दाढ्या धरीत होता. त्या काळीं ह्यांचीं कळकट उपरणीं त्याच्या जोड्याला लागलीं असतीं, तरी त्यानें तो पॉलिशसाठीं फेकला नसता! तेव्हां [illegible]

म्युनिसिपालिटीच्या लोकांशीं तो झोकांत हस्तांदोलन करीत असे. आणि आज ते त्याला मुष्किलीनें पाय धरूं देत होते.

—छेः छेः ! महादेव जवळपास स्वतःचें नांव विसरला होता. स्वरूपकुमार केव्हांच प्रो. मोऱ्यांबरोबर गेला. आणि महादेव ? महादेव, फार फार पूर्वीं आईबापांपाशींच राहिला. आईबापांनाही तो आज आठवण असूनही मोठ्या चमत्कारिकपणें विसरला होता. आईबापांच्या गांवाविषयींही तेंच ! फक्त एकच त्याला माहीत होतें, कीं तो महादेवही नव्हता व स्वरूपकुमारही नव्हता. तो कोणीतरी वेगळाच होता व निरनिराळया गांवांची धूळ खात भटकणें एवढेंच त्याचें काम होतें.

असाच भटकत तो आमच्या गांवीं आला. आमच्या घराला लागूनच आठवडी बाजाराचें भलें मोठें पटांगण होतें. आमच्या घराच्या जवळ जवळ भिंतींच्या आसऱ्यानेंच त्यानें आपली राहुटी ठोकली. तेथून जवळच त्यानें त्याच्या मोटरसायकलच्या मानमोड खेळासाठीं उंच उंच फळ्यांचा एक वर्तुळाकार पिंजरा उभा केला व आंत चाललेला खेळ प्रेक्षकांना दिसावा म्हणून उभ्या लाकडांच्या आधारानें त्या पिंजऱ्याभोंवतीं वर फळकटें लावून दिलीं. ती गाडलेल्या फळ्यांची विहीर, तिच्या भोंवतींची ती लाकडी बैठक व ह्या साऱ्या वैभवाभोंवतीं दोऱ्यांनीं बांधलेलें बांबूंचें कुंपण, एवढा देखावा मनासमोर आणला, कीं महादेवच्या क्रीडाभूमीची कल्पना पुरी झाली.

माझ्या माडीच्या खिडकींतून महादेवचे दैनिक व्यवहार मला सहजगत्या दिसत. सकाळीं साडेनऊपर्यंत सामान्यतः त्याला जाग्या जगाची चिंता नसे. अनेक ठिगळें लावलेल्या व कांहीं वर्षांच्या उष्णतामानाचा आणि पर्जन्यमानाचा आढावा देणाऱ्या आपल्या राहुटींत तो मुरकुंडी मारून तोंवर झोपलेला असे. त्याला मध्येंच विवळून बडबडत सुटायची सवय आहे, असेंही माझी आई मला सांगे. साडेनऊनंतर तो आपली खाट ओढून बाहेर आणी, आणि घराच्या सावलींत आपल्या मळकट बिछान्यावर उगीच एखादें ‘ सस्ता साहित्या ’ चें पुस्तक चाळीत लोळत पडे. मग एक चहा विकीत फिरणारा पोऱ्या कळकट कपांतून त्याला चहा देई. महादेव चहा घेई आणि थुंके. मग तो आणखी एक कप काळसर गढूळ चहा घेई व ओल्या काथानें

बरबटलेली पट्टी चघळून पुन्हा चार-दोनदा थुंके आणि कूस बदलून आपलें 'सस्ता साहित्य' वाचन चालू करी.

त्याचें जेवण असेंच कोठेंतरी गांवांतल्या घाणेरड्या हॉटेलांत होत असलें पाहिजे. कारण केसांना फणी किंवा तेलाचा संस्कार न करतां डोकें पिंजारून आणि एक कसला तरी सदरा, पॅन्ट व जुना जोडा चढवून तो साडेबारा, एकला आपल्या राहुटीबाहेर जाई व घंटा दीड घंटा चक्कर खाऊन परत येई. कदाचित् संध्याकाळीं तो शेवचिवडा किंवा पुरीभाजी किंवा असलेंच कांहीं तरी बाजारू पदार्थ पोटांत भरून भूक भागवीत असेल. कारण त्याच्या राहुटीसमोर तेलकट कागद उडतांना मला नेहमीं दिसत.

चालतांना मान खालीं घालून चालायची त्याला सवय होती. उंचीनें तो पुरा होता आणि त्याचा बांधा म्हणाल, तर तो खरोखरच एखाद्या ग्रीक देवाचा होता. भरलेली छाती, रुंद खांदे, विशाल बाहू आणि जवळजवळ जिला सिंहकटी म्हणावें, अशी बारीक रबरी कंबर! त्याच्या चेहेऱ्यावर निर्विकारतेचा एक पडदा पडला होता, पण त्याच्या लवचिक हालचालीत मात्र मर्दानी खेळाडूचें काव्य होतें! ती हालचाल पाहिली, कीं त्याचें थुंकणें, त्याचे पिंजारलेले केस, त्याची ती मळकट पॅन्ट व गंजीफ्रॉक, ह्या साऱ्यांचा विसर पडे व वाटे कीं गांवगन्ना कोठलेंही मैदान ही कांहीं ह्या माणसाची जागा नव्हे! ह्याला जर घरादाराचा थारा मिळेल, दोन तांबे ऊन पाणी जर ह्याच्या आंगावर दररोज पडेल आणि शेवचिवड्यापासून जर ह्याची मुक्तता होईल, तर ह्याचा हा भुरकट रंग उजळेल, ह्याच्या तोंडावरचा पडदा गळून पडेल आणि लांबट चेहेऱ्याचा, तरतरीत नाकाचा व दाट केसांचा एक नवाच उमदा तरुण धुळीच्या ह्या हलत्या थरांतून उत्पन्न होईल. दिवसभराचें त्याचें आळसणें, कुशी बदलणें आणि हेतुशून्य भटकणें संपून सायंकाळीं खेळाच्या आधीं जेव्हां तो स्नान व पोशाख करी, तेव्हांच ह्याचें प्रत्यंतर येई.

बारापंधरा हजारांच्या आमच्या गांवांत हा मानमोड मोटरबाइकस्वार आमच्या अगदीं भिंतीला लागून उतरल्यामुळें आमच्या घरच्या पोरांना आपला सामाजिक दर्जा वाढल्यासारखा वाटत होता. ते डोळे विस्फारून त्याच्या करामतीच्या कथा मला सांगत. उलट दर संध्याकाळीं होणारी थोडीफार गर्दी आणि मोटरसायकल व फळ्या ह्यांचा कानठळ्या बसवणारा आवाज माझ्या अगदीं मस्तकीं

बसला होता. चाकू, काऱ्या, सुऱ्या, नट व भटके खेळाडू हीं लहान मुलांचीं खेळणीं नसल्याविषयीं मी त्यांना बजावून सांगें.

परंतु दुसऱ्याचीं दुखणीं निस्तरत बसायची आमच्या आईला सवय आहे. तसें नसतें, तर महादेवच्या झोपाळू लीला दुरूनच पाहाण्यांत मीं संतोष मानला असता. दुसऱ्याच्या भानगडीकडे शक्य तों दुर्लक्ष करावयाचें असा माझा बाणा आहे. उलट दुसऱ्याच्या भानगडी आपल्याच समजून त्या आवरत बसायच्या अशी आमच्या आईची सवय आहे. तिच्या सवयीमुळेंच महादेवचा आमच्या घरीं प्रवेश झाला.

एके दिवशीं संध्याकाळीं खेळ करीत असतां महादेवला अगदीं लहानसा अपघात झाला. अर्थात् पोरांनीं बातमी घरीं आणली. मीं दुर्लक्ष केलें. आई मात्र " अयाई–बिचारं पोर ! " म्हणून सतरांदा शेजारच्या राहुटीकडे पाहूं लागली. त्या रात्रीं वेदनेनें महादेव विवळत असला पाहिजे. कारण आमच्या आईनें भर बारा वाजतां त्याला काय होतें आहे तें पाहाण्याविषयीं मला आज्ञा सोडली. 'साऱ्या जगांतलीं दुःखं नाहींशीं करण्याचा कांहीं आपण पत्कर घेतला नाहीं' असें म्हणून मीं माझी नापसंती व्यक्त केली. 'आपल्या शेजारीं कुणाला दुःख असेल तर त्याचं केलं पाहिजे एवढं मला कळतं.' असे निर्वाणीचे शब्द आईनें काढले. माझ्या त्रयस्थ आळशीपणाला नैतिक बळ नाहीं हें व आईच्या इच्छेवर मात्रा नाहीं हें लक्षांत आल्यामुळें मी धडपडत महादेवच्या राहुटीवर गेलों व त्या लंगडणाऱ्या प्राण्याला माझ्या मातृदेवतेच्या स्वाधीन केला. त्यानंतर महादेव शेकला गेला, उपचारिला गेला व अखेर आमच्याच घरीं निजवलाही गेला.

येथून महादेव रोज आमच्या येथें येऊं लागला. आला कीं तो माणसाळलेल्या वाघासारखा प्रथम आईचे पाय चाटून येई. जिभेचा दुसरा उपयोग त्याला फारसा ठाऊक नव्हता. तो येई, खालच्या मानेनें थोडा वेळ बसे, माझ्या कपाटांतून 'सरस सुरस' मालेचें एखादें पुस्तक मागून घेई व आपला रस्ता धरी. एक गोष्ट माझ्या लक्षांत आली होती. महादेव संभावित होता. भल्या घरचे रीतिरिवाज त्याला माहीत होते. ते पाळतांना त्याला एक अभिमान व आनंद वाटत असे. भटक्या उडाणटप्पूंचा बेइमान कलंदरपणा त्याच्यांत नव्हता. आमचें घर पोरींबाळींचें आहे. पण महादेवची मान कधीं वर झाली

नाहीं कीं त्याच्या नजरेंत तो पापाची क्षणिक फिरत कधीं उमटली नाहीं. आपल्या नेहमींच्या मळकट पोषाखानें व पिसकारलेल्या केसांनीं तो कधीं आमच्या येथें आला नाहीं. माझी अशी खात्री आहे, कीं आमच्या येथें येण्यासाठीं महादेवनें नवे कपडे केले व आमच्या येथें येतांना संकोच वाटूं नये म्हणून आपल्या राहुटींतला देखावा व सवयीही भराभर बदलल्या. साडे नवाला उठणें, शेव-चिवड्याचे कागद उडवणें, पानपट्टी खाऊन भराभर थुंकणें, मळकट आंथरुणांत लोळत पडणें, इत्यादि लकबींची आपल्या दैनिक आयुष्यक्रमांतून त्यानें फार त्वरेनें वजावट केली. आपल्याला एका आसऱ्याच्या ठिकाणीं जायचें आहे व आपल्याला कोणी पाहात आहे ही जाणीव त्याला झाली असली पाहिजे. निदान चहा घेतल्याशिवाय आमची आई महादेवला कधीं परत जाऊं देत नसे. तिनें त्याला आमच्या घरीं जेवायलाही पुष्कळदा बोलावलें. बाजारांतल्या खाण्यावर जेमतेम जगलेल्या महादेवला आमच्या येथला पाहुणचार घेतांना मोठा उत्कट आनंद होत असला पाहिजे. घरांत पाटापाण्याची गडबड आणि मुलीबाळींची धावपळ सुरू झाली, कीं महादेवच्या थंड पडलेल्या डोळयांत सुद्धा वेगळें पाणी तरंगत आहे असा मला भास होई. त्याला वाटत असलें पाहिजे, कीं 'हें एक कुटुंब आहे. एकमेकांविषयीं आस्था बाळगून नि एकमेकांवर प्रेम करून इथलीं माणसं जगतात. इथल्या ह्या सात्त्विक अन्नपाण्यांत शरीर आणि मन पोसायचा केवढा गुण आहे! चहा–भज्यांवर नि मोल लावलेल्या बाजारू अन्नावर देह जाळणारा मी–महादेव माने–आज ह्या अन्नपाण्याचा व कौटुंबिक सुखाचा वांटेकरी होणार आहें.'

ह्याच कल्पनेनें महादेव अन्नावर बसत असला पाहिजे. प्रत्येक घास तो मोठ्या चवीनें व कृतज्ञतेनें खाई. पाट, पाणी, उदबत्त्या, रांगोळ्या—सगळ्यांचाच त्याला मोठा आनंद होता. गृहस्थी जीवनाच्या प्रत्येक हळव्या व सुंदर विशेषाचें जणूं तो मनोमन टिपण करून घेई. पण तरीही त्याच्या तोंडून कधीं औपचारिक आभाराचा शब्द निघाला नाहीं, कीं सुखाच्या उबेनें कधीं त्याची मान उंचावली नाहीं! सर्कशींतल्या त्या मुक्या जनावराला जर कांहीं सुखदुःख असेल, तर तें ज्या कोणा मनकवड्याला जाणतां येत असेल, त्यानें जाणावें.

मला आजकाल ती इच्छा झाली होती, कारण माझें ह्या पाळीव प्राण्याविषयीं हळुहळू चांगलें मत बनत गेलें होतें. सवंग बोलघेवडेपणानें त्यानें आपल्या सुखदुःखांचा बाजार माझ्यासमोर मांडून सहानुभूतीचा सौदा पटविण्याचा प्रयत्न केला असता तर त्रयस्थ तुच्छतेपलीकडे माझ्यापासून त्याला कांहीं मिळालें नसतें. परंतु त्याच्या ह्या साऱ्या सहनच करीत जाणाऱ्या अबोल, मख्ख धिम्मेपणानें मात्र मला चांगलेंच डिंवचलें होतें. एक दिवस दुपारीं तो माझ्याकडे 'मर्दानी सौंदर्य' नांवाचें मिस् अमेलिया कार्टरच्या पराक्रमांची सविस्तर हकिगत सांगणारें पुस्तक मागावयास आला. मुकाट्यानें पुस्तक काढून देऊन दहा पांच जुजबी वाक्यांत त्याची बोळवण करण्याऐवजीं मीं त्याला बसायला सांगितलें. माझ्या गुबगुबीत खुर्चीत तो मोठ्या समाधानानें बसला. बसण्यांत सुद्धा दिसणाऱ्या त्याच्या आविर्भावांचा विचार करीत मीं त्याला एकदम कधीं विचारले नव्हते असे जिव्हाळ्याचे प्रश्न विचारायला सुरुवात केली.

"काय रे महादेव, तुला कधीं आपल्या आईबापांच्या भेटीला जावंसं नाहीं वाटत?"

त्यानें नकारार्थी मान हालवली!

"कां बरं?"

"कां कोण जाणे!"

"बरं तुला लग्नही नाहीं करावंस वाटत?"

"फार उशीर झाला बाळूदादा! बत्तीस वर्सं झालीं वयाला! तशांत हा बिऱ्हाड पाठीवर घेऊन भटकण्याचा पेशा, आणखी रोज यमपुरीपर्यंतची वारी! कशाला कुणाचे श्राप घेऊं?"

"मग हा पेशा सोडून कां नाहीं देत?"

"फार उशीर झाला बाळूदादा!"

"पाहा महादेव, ना तुझ्या डोळ्यांना मागचं टोक दिसत ना पुढचं. असाच भटकत जगणार तूं?"

"ह्यांतच मरणार आम्ही एक दिवस!"

"अरे काय बोलतोस! नाहीं म्हटलं तरी तूं अजून तरुण आहेस. आंगांत अजून रग आहे तुझ्या. पण पुढें एक दिवस कदाचित् असा येईल कीं तेव्हां तुला वाटेल–आपलं जिणं व्यर्थ गेलं. आयुष्याचं कांहींच सार्थक नाहीं झालं आपल्या हातून !"

"कांहींच सार्थक नाहीं झालं !" माझेच शब्द त्यानें अभावितपणें यंत्रासारखे उच्चारले आणि माझी चूक नसेल, तर एक अतिशय सूक्ष्म उसासा सोडला. "हें बघ महादेव, तूं आमचं कुटुंब बघतोस. पिशाच्चासारखं भटकणं नाहीं इथें. प्रत्येकाला परत यायला जागा असते. प्रत्येकाला परत यायची ओढ असते. परत यावंच लागतं प्रत्येकाला. नुसतंच धावणं नाहीं, तर इथें विश्रांतिही आहे. एकमेकांच्या सावलींत माणसं इथें सुखावून जगतात. एकाचं हृदय दुसऱ्यासाठीं धडधडतं. आई, दादा, मी, ताई, ती! साऱ्यांचे सूर एक लागतात! विचार कर महादेव !"

"फार उशीर झाला बाळूदादा !"

"कसला रे डोंबलाचा उशीर झाला ? मोटरसायकलच्या चक्रासारखं जिणं तुझं. ती वंगण तरी मागते, तुला तेंही नाहीं ! कशाच्या आधारावर हें जिणं जगतोस ? जगण्याची ही बेशरम शक्ति आणतोस कुठून ? दिवसाचे चोवीस तास, नि चोवीस तासांचे असे किती तरी दिवस घालवतोस–काळाचं हें लोंबत बसणारं मुर्दाड ओझं ओढीत बसतोस! सार्थकाच्या कोणत्या चार क्षणांच्या आशेवर ?"

मला वाटतें, त्याच्या जिवाची तगमग झाली. चेहेरा नेहमींप्रमाणें निर्विकार होता, पण खुर्चीतल्या खुर्चीत चार दोनदा त्यानें मान वेळावली. पांच मिनिटं तो 'मर्दानी सौंदर्य' चाळीत शांत बसला. त्याची ती शांतता पाहून माझा राग मात्र चढत होता. थोड्या वेळानें तो म्हणाला,

"आज संध्याकाळीं माझा खेळ पाह्यला याल बाळूदादा ?"

"नाहीं !"

"कां बरं ?"

"मला हे असले पोरखेळ मुळींच आवडत नाहींत! दत्तू, गणूला घेऊन जा!"

"पोरखेळ नाहीं दादा ! आमच्या सर्कसला माझ्या ह्या कामावर फार चांगलं

पैसा मिळायचा. आतां माझ्याजवळ कपडे आणि सामान नाहीं बघा, नि लोकांनाही तेवढो आवड नाहीं राहिली, म्हणून! पण तुम्ही याच आज!"

"नको रे बुवा!"

"एवढं ऐका ना गरिबाचं!"

स्वतःच्या गरिबीचा उल्लेख करून जेव्हां कोणी माझ्याशीं बोलतो, तेव्हां सामान्यतः माझ्या निश्चयाचा बंधारा फुटतो. आतांही तसेंच झालें. निश्चयाचा नकार सोडून मीं गुळमुळीत स्तब्धता स्वीकारली. मौनाच्या ह्या खिंडारांतून आंत घुसून मला पुरताच पाडाव करणारें वाक्य महादेव अखेर बोलला—

"तुम्ही जर आज संध्याकाळीं माझा खेळ पाह्यला आलां कीं नाहीं बाळूदादा, तर आतांपर्यंत तुम्ही जें कांहीं बोललांत, त्याचं उत्तर द्यायचा प्रयत्न मी करीन!"

■ ■ ■

आज बाजारचा दिवस होता आणि त्यांत गांवांतल्या 'जंट्री'नेंही काय मनावर घेतलें कोणास ठाऊक. महादेवच्या बासाड्यांच्या कुंपणांत प्रेक्षकांची चांगलीच गर्दी जमली होती. आमच्या छोट्याशा गांवांतला सगळा फुलोरा तेथें गोळा झाला होता. बायकांची गोष्टच सोडा म्हणा! त्या तर आजकाल नाहीं तेथें प्रथम जाऊन धडपडतात. मला वाटतें, दुसऱ्यानें जीव धोक्यांत घालून केलेला खेळ अंगावर शहारे आणीत व तोंडानें 'स्-स्' करीत पाहाण्यांत बायकांना विशेष आनंद वाटतो. तो त्यांचा ईश्वरदत्त स्वभाव आहे. कारण महादेवचे खेळ पाहायला दररोज इतर कोणी नसलें तरी त्याच त्या बायका बिनचूक उपस्थित असत. आजही म्हाताऱ्या भगतशेटची शेटाणी व त्याच्या ललितागौरी, मृदुलाबेन आणि अर्धा डझन कन्यका, वर्धमान मारवाड्याची फुलकुंवर, गांवच्या मानानें फाजील नखरेल असणारा इंग्रजी शाळेंतील मिस् सुंदर अष्टपुत्रे हिच्या नेतृत्वाखालील लफ्फेबाज पदरांच्या मास्तरणींचा फड, आदि बराच महिलासमाज महादेवच्या मानमोड कसबाचें कौतुक करायला तेथें एकत्र झाला होता. ह्याशिवाय नगरशेट मगनभाई, वर्धमानशेट, अब्दुल हुसेन बिडीवाला, हेडमास्तर रकटे, तहसिलदार

तेरडे, पोलिस इन्स्पेक्टर तिस्मारखान, ग्यानू पाटील, वे. शा. सं. भडभडे आदि बऱ्याच सज्जनांनीं आपल्या उपस्थितीनें त्या कामट्यांच्या कटघरास शोभा आणली होती. ह्याखेरीज मुंडासे सावरणारे कित्येक गांवढळ व शिट्या वाजविणारीं पोरटीं वेगळींच !

ग्यासच्या दोन चार बत्त्या भगभगूं लागल्या. थोड्याच वेळांत महादेव ऊर्फ स्वरूपकुमार जमिनीसरशा असणाऱ्या खालच्या दारानें त्या पंधरा वीस फूट उंचीच्या उभ्या लाकडी विहिरींत शिरला. सारा प्रेक्षकसमुदाय बाजूच्या शिडीनें वर चढून त्या विहिरीच्या तोंडाशीं गोलाकार उभा राहिला. कित्येक वर्षांच्या वापरीनें खिळखिळया झालेल्या मोटरसायकलला लाथा मारून ती सुरू करण्याच्या प्रयत्नांत महादेव चूर होता. फाड्–फाड्–फट्–फट्–फट् असा आवाज त्या लाकडी विहिरींतून घुमत होता. जवान हिंदुस्थान शिट्या फुंकून टाळ्या वाजवीत होता. जरठ हिंदुस्थान एखाद्या संत्रस्त अस्वलासारखा चेहेरा करून पुढें काय होतें, त्याची वाट पाहात होता. ललित भारतानें कंठावर हात ठेवून चीत्कार करण्याची तयारी ठेवली होती.

आतां मी असें निःसंशय म्हणेन कीं महादेव देखणा दिसत होता. स्वस्त पण सुंदर काळ्या जपानी टाफेटाची तुमान त्यानें घातली होती व मनगटाशीं तंग असणारा फुगीर बाह्यांचा तसलाच सद्रा त्यानें घातला होता. त्याचे कुळकुळीत जोडे चांगल्यापैकीं होते. त्याचे केस उत्कृष्ट प्रकारें फिरवलेले होते. चेहेरा तुळतुळीत दिसत होता. डॉक्टर ऑपरेशन करतांना सुंदर दिसतो. नट रंगभूमीवर सुंदर दिसतो. महादेव त्या लाकडी विहिरीच्या तळाशीं आणि धडपडणाऱ्या मोटरसायकलच्या सहवासांत सुंदर दिसत होता.

लाथा मारून मारून त्या काळ्या वेगवतीला महादेवनें खूप चिडवलें. ती फुसांडली, आंगभर कांपूं लागली व तिनें वेग घेतला. महादेव तिच्यावर स्वार झाला होता. प्रथम त्यानें जमिनीवरच चारदोन वर्तुळें घेतलीं, वेग वाढवीत नेला, आणखी वाढवीत नेला व तो अचानक जमिनीवरून त्या लाकडी विहिरीच्या उभ्या भिंतीवर चढला. आतां महादेवला उन्माद चढला. त्या लाकडी परिघावर तो जणूं वेगाचीं वर्तुळें काढूं लागला. त्याचा देह व त्याचें वाहन ह्यांनीं विहिरीच्या तोंडावर उभ्या असणाऱ्या प्रेक्षकांशीं काटकोन केला होता. महादेव जणूं गति प्याला होता. त्याच्या कपाळावरची शीर

फुगली होती. त्याच्या ओठांवर बेफिकीर उन्मादाचें अस्फुट हास्य उमटलें होतें. त्याचे केस व कॉलर सारखी फडफडत होती. त्या फोफावत धावणाऱ्या वेगवतीला वाटेल तशी वाकवण्याइतका त्याचा रबरी देह समर्थ होता. त्याचे खांदे मजबूत होते. मनगटांत पकड होती !

वेग वाढूं लागला, आणि त्याबरोबरच महादेवचा बेफामपणाही ! तो तळापासून उलटी सूर घेऊन जवळ जवळ वरच्या प्रेक्षकांच्या भेटीस येई व पुन्हा परत खालीं जाऊन तिरकस वर्तुळें कापूं लागे. गति व गर्जना सारखी त्या विहिरींत घुमत होती. लाकडी भिंतीला आडवें चिकटून धडधडणारी ती धूरचाकी वर उभ्या असणाऱ्या प्रेक्षकांना सारखे हादरे देत होती ! वेग वाढत होता ! वेग वाढत होता—आणि त्या वेग-व्यापाऱ्याचा उन्माद !

सारखीं पांच मिनिटें तो जिवाच्या होडीचा खेळ चालला होता. ती धूरचाकीही विचित्र होती. ना तिला मडगार्ड ना हॉर्न ! गरीब भटक्याच्या सहवासांत तिची दुरुस्ती देखील जेमतेमच होत असेल. थोडीही चूक झाली असती तर तेथें रक्तमांसाचा चिखल आणि खूप धूर ओकणारें एक मोडकें यंत्र दिसलें असतें. पण तसें झालें नाहीं. पांच मिनिटें तो खेळ तसाच चालू राहिला.

त्या पांच मिनिटांत महादेवनें साऱ्यांचे श्वास हिरावून घेतले किंवा त्यांना विलक्षण गति दिली. साऱ्यांच्या डोळ्यांचें एकच लक्ष्य होतें. सारीं हृदयें एकाच कारणासाठीं धडधडत होतीं. सारीं शरीरें एकाच कारणासाठीं कांपत होतीं. सारे जीव एकाच धाग्यावर टांगले होते. ती फुगेदार केसांची मृदुला, ती तन्वंगी ललिता, ती लफ्फेदार पदराची सुंदर, ती फुलाच्या चेहेऱ्याची फुलकुंवर, तो बोकडमिशांचा तिस्मारखान, तो गब्बाळमूर्ति भडभडेशास्त्री, तो ज्ञानलवदुर्विदग्ध रकटे मास्तर, साऱ्यांचीं पांच मिनिटें परस्परांशीं व महादेवशीं एकतानता व एकरूपता झाली होती. महादेवचा नव्हे, आपला स्वतःचा जीव धोक्यांत आहे असें त्यांना वाटत होतें !

अखेर तीं पांच मिनिटें संपलीं. धूरचाकीचा वेग कमी झाला. तिचा कोलाहल करणारा नाद ओसरला. उभ्या भिंतीवरून तिनें खालच्या भुईवर तीनचार वळसे घेतले व ती श्रमाचे उसासे टाकीत थांबली. आतां ती आक्रस्ताळी त्रया, महादेवच्या पायांशीं पडलेल्या एखाद्या खेळण्यासारखी दिसत होती.

ह्या खेपेस मात्र साऱ्यांनीं टाळ्यांचा कडकडाट केला. वडील पिढीलादेखील तो शक्तीचा अपव्यय वाटला नाहीं. कौतुकाच्या नजरा महादेववरून फिरून गेल्या. त्याचा तांबडा पडलेला चेहेरा जेवढा श्रांत होता, त्यापेक्षां किती तरी अधिक प्रफुल्ल होता.

थोड्याच अवकाशांत सारी गर्दी ओसरली. बाजार उठला होता. बैलांच्या घुंगरांचे चुकार आवाज ऐकूं येत होते. रॉकेलचें पेटतें डब्बडें उगाच कोठें एखादें भाजीचें नाहीं तर हलवायाचें दुकान दाखवीत होतें. आभाळांत वर्दळीची धूळ उसळली होती.

खालच्या दारानें मी त्या लाकडी विवरांत प्रवेश केला. महादेव आपली धूरचाकी घेऊन आरामांत बसला होता. मी जातांच त्यानें विचारलें,
" काय बाळूदादा, कळलं ? "

मला कळलं असावं असा भास होत होता, पण कळलं कीं नाहीं, ह्याविषयीं निश्चिति मात्र नव्हती. म्हणून मीं नुसतेंच विचारलें, " काय ? "

" मी कशावर जगतों तें ? माझ्या आयुष्याचें सार्थक काय तें ? "

" काय ? सांग बरं ! "

" ह्या पांच मिनिटांवर मी जगतों बाळूदादा ! हीं आत्तां गेलीं तीं पांच मिनिटं ! नुसता शरीरानेंच नाहीं, तर मनानें मी त्यांच्यावरच जगतों. मी एक गरीब भटक्या, ना मला आगा ना पिच्छा ! माझ्यासाठीं रडेल कोण नि हसेल कोण ? पण कुठलीं कुठलीं तुम्ही अनोळखी माणसं, पांच मिनिटांतच माझ्यासाठीं किती वाटून घेतां ? काळजी, भीति, चिंता, कौतुक—सारं तुम्हांला माझ्यासाठीं ह्या पांच मिनिटांत वाटतं. नि तेंही किती तीव्रतेनें ! मी मोटरीला वेग देतों, खूप वेग देतों, नि सारखा मृत्यूला चिथावतों ! तुमचे चेहेरे पाहून तसं करायला मला आणखीनच जोर येतो ! ललितागौरी, फुलकुंवर, वर्धमान, ह्यांना काय माझ्यासाठीं काळजीनें कंप सुटावा ? मी—महादेव माने—स्वरूपकुमार ! माझ्यासाठीं ? होय, त्या पांच मिनिटांत मी महादेव असतों, मी स्वरूपकुमार असतों, नि माझ्यांत अभिमानाचा खूपसा मीपणाही असतो ! माझ्या मानसिक शुद्धीचीं, माझ्या

अभिमानाचीं तीं पांच मिनिटं आहेत. फक्त तेव्हांच मला एखाद्या कुत्र्यासारखं वाटत नाहीं. माझ्या जिण्याच्या मुर्दाड चोवीस तासांचं सार्थक त्या पांच मिनिटांत होतें आणि म्हणूनच मी जगतों !'

# पाखरूं

पाऊस थांबला. ढग वितळले. जाईच्या मांडवावर सूर्याचीं सोनेरी किरणें पसरलीं. पानापानाला बिलगून बसलेले पावसाचे थेंब प्रकाशांत तळपूं लागले. साळुंकीनें आपलें आंग फुगवून एकदा झटकलें व घरट्याबाहेर झेप घेतली. तिच्या मागोमाग तिचा जोडीदारही "चुंऽऊंऽ" करीत बाहेर पडला. आंतील पिलानें घरट्याबाहेर किंचित् मान काढली व किलबिलाट केला.

ह्याच संधीची तो मुलगा मघांपासून वाट पाहात होता. गच्चीवर जाऊन त्यानें वाकून बघितलें. त्याची आई जाईच्या मांडवाखालीं फुलें वेचीत होती. साळुंकी दूर हिरवळीवर पिलासाठीं चारा टिपीत होती.

निर्धास्तपणें तो खोलींत परत आला व त्यानें भिंतीशीं एक स्टूल ओढून घेतलें. स्टुलावरून चपळपणें तो खुंटीला लोंबकळला व एक झोका घेऊन बाजूच्या कोनाड्यांत त्यानें आपले पाय स्थिर केले. आपले निळे डोळे विस्तारून फोटोआड असलेल्या घरट्यांत आंग मोडून तो डोकावूं लागला.

त्याला बघतांच बावरें होऊन पिलूं आंत सरकलें. मुलानें आपलें डोकें अधिकच जवळ नेलें. ह्या खेपेस तें पिलूं त्याला फारच सुंदर वाटलें. थोड्याच दिवसांपूर्वीं कातडीखालीं झाकलेले त्याचे डोळे आतां कसे काळेशार दिसत होते. कोवळ्या पंखांची नवीन झूल त्याला किती शोभून दिसत होती. फिकट पिवळ्या रंगावर आलेल्या चोंचीचा बांक तरी किती झोकदार होता !

पिलांत झालेला हा विलक्षण बदल पाहून मुलगा स्तंभित झाला.

मानेला कळ लागेपर्यंत तो पिलाकडे बघत होता. त्या दिवसापासून रोज साळुंकीच्या घरट्यांत डोकावून बघण्याचें त्याला वेड जडलें.

हळुहळू पिलाचाही संकोच नाहींसा झाला. आईबाप बाहेर गेले म्हणजे पिलाला अगदीं करमेनासें होई. अशा वेळीं निळ्या डोळ्यांच्या त्या गोड मुलाची तें अगदीं वाट पाहात बसे.

खालीं स्टूल ओढल्याचा आवाज झाला व मुलाचे सोनेरी केस दृष्टीस पडले कीं त्या चिमण्या पाखराला विलक्षण हर्ष वाटे.

घासभरल्या चोचीनें उडत येणाऱ्या आईबापांविषयीं सुद्धा त्याला इतकी उत्सुकता वाटली नसेल.

हातांपायांना ताण असह्य होईपर्यंत मुलगा पाखराकडे पाहात बसे.

मुलगा बागेंत खेळावयास निघून जाई व पाखरूं दुःखित अंतःकरणानें पराच्या उशींत तोंड लपवी.

असा क्रम कांहीं दिवस चालू होता. एके दिवशीं पाखराच्या आईबापांनीं मुलाला घरट्याभोंवतीं घोटाळतांना बघितलें.

त्याच दिवशीं साळुंकीनें आपल्या पिलाला मुलांच्या दुष्ट स्वभावाविषयीं बजावून टाकलें.

"मुलं अजाण पाखरांना फसवतात. तीं त्यांना घरट्यांतून ओढून काढतात आणि पायांना दोरा बांधून त्यांचा नुसता निर्दयपणें खेळ करतात!"

पाखराला ह्यांतलें कांहींच समजलें नाहीं. फसवणूक व जाच ह्याविषयीं नुसती अटकळ सुद्धा त्याला करतां येईना.

आपल्या पोराला पाखराचा नाद लागला आहे ही गोष्ट मुलाच्या आईनें देखील लवकरच ओळखली.

तिनेंही मुलाला खडसून सांगितलें, "पाखराच्या नादीं लागूं नकोस. एखादे वेळेस हात-पाय मोडून घेशील, नाहीं तर त्या पिलाचे आईबाप डोळे फोडतील तुझे! खबरदार पुन्हा मला तिथें चढतांना दिसलास तर!"

पिलाच्या मनावर त्याच्या आईच्या उपदेशाचा मुळींच परिणाम झाला नाहीं. मुलानें आपल्या आईच्या उपदेशाकडे पूर्ण दुर्लक्ष केलें.

पाखराचा मुलावर आणि मुलाचा पाखरावर सर्वस्वीं विश्वास होता.
सोनेरी केसांचा मुलगा दुष्ट नाहीं हें पाखराला ठाऊक होतें.

गोजिरवाण्या पिलासाठीं पाय मोडला तरी पर्वा नाहीं असें मुलाला वाटत होतें.

पक्षीराज्यांतल्या क्रूर कायद्यांची जाणीव भाबड्या पिलाला नव्हती. माणसाच्या रीती मुलाला ठाऊक नव्हत्या.

मुलगा पांखराचा नाद सोडीत नाहीं हें पाहून मुलाच्या आईनें त्या खोलीला कुलूप ठोकलें व मुलाचें तेथें जाणेंच अशक्य करून टाकलें.

कांहीं झालें तरी पांखरूं मुलाला विसरत नाहीं हें पाहून पिलाच्या आईबापांनीं पिलाला तेथून अजिबातच हलवायचें ठरवलें.

पिलाच्या शरीराची व सौंदर्याची वाढ जवळ जवळ पूर्ण झाली असली तरी त्याच्या पंखांत अजून जोर भरला नव्हता.

भूक लागली म्हणजे टाहो फोडून त्याला आईबापांसमोर चोंच पसरावी लागे. पंखांत बळ नसल्यामुळें एवढ्याशा खोप्यांत रात्रंदिवस त्याला डांबून बसावें लागे.

मुलाचें येणें बंद झाल्यापासून पिलाला आपल्या पंखांचा उपयोग करण्याची वारंवार इच्छा होऊं लागली.

लहानग्या पांखराला उडावयास शिकवणें पक्षी आणि पक्षीण ह्यांनाही आतां अवश्य वाटूं लागलें.

प्रथम खोलींतल्या खोलींत तें उडण्याचे धडे घेऊं लागलें. लवकरच त्याला जमिनीशीं समांतर अशी पांच सात हातांची झेप घेतां येऊं लागली. पुढें बरीच उंच अशी सुळकांडीही तें मारूं लागलें.

पांखराच्या आईबापांना वाटलें, आतां आपणांस मुलाचें घर सोडावयास हरकत नाहीं.

एके दिवशीं पक्षी खिडकीच्या गजांतून बाहेर गेला व "चऊ ऽऽकू" असा शब्द करून त्यानें पिलाला बाहेर बोलावलें.

कसेतरी पंख मारून पिलूं बाहेर आलें व गच्चीच्या कठड्यावर क्षणभर विसांव्यासाठीं टेकलें. मोकळी हवा, निळें आकाश व उडण्याचा अनुभव ह्यामुळें त्याला विलक्षण प्रसन्न वाटलें. कुतूहलानें त्यानें सभोवार दृष्टि फेकली.

बागेंतलें दृश्य बघून पांखरूं देहभान विसरलें.

जाईच्या मांडवाशेजारीं हिरवळीवर मुलगा हुदडत होता. त्याचे सोनेरी केस एखाद्या देवकुमाराच्या प्रभेसारखे त्याच्या मस्तकाभोवतीं पसरले होते.

कोवळ्या उन्हांत मुलाच्या निळ्या डोळ्यांना निराळेंच पाणी चढलें होतें. खेळण्याच्या श्रमानें त्याचा चेहेरा लालबुंद झाला होता.

पांखराला आतां बिलकूल राहावेना. हर्षातिरेकानें 'चुऊऽकूऽ' असा आवाज करून त्यानें एकदम पंख पसरले व तें तडक मुलाच्या खांद्यावर जाऊन बसलें.

मुलाला आनंदाचा आवेग आवरेना. त्यानें पिलाला हातांत धरून कुरवाळलें व त्याच्या चोंचीला आपला गाल लावला.

तेवढ्यांत...

कर्कशपणें त्याची आई कडकडली,

"कार्ट्या, काय मांडलं आहेस तूं हें ?"

मुलगा दचकला व त्याची पांखरावरची पकड एकदम सैल झाली.

निराळ्या तऱ्हेचे पण तसलेच कर्कश असे आणखी दोन आवाज झाले.

"ट्य–ट्याव्–ट्य–ट्याव्–कीं–कीं: !"

मुलाच्या डोक्यावर पांखराचे आईबाप घिरट्या घालीत होते.

पांखरूं दचकलें व एकदम उडून कौलावर जाऊन बसलें. आपल्या आईबापाचा शब्द त्यानें ओळखला. पण आवाजांतला हा भेसूर उग्रपणा मात्र त्याच्या परिचयाचा नव्हता.

पांखरानें आपल्या मातापितरांकडे बापुडवाणी दृष्टि फेकली. सहानुभूति तर नाहींच पण दोन गिरक्या घेऊन गवतांतल्या आळीवर घालावी तशी निष्ठुर झडप त्यांनीं आपल्या पिलावर घातली. दोघांनीं मिळून त्याला उलथें पाडलें.

गांगरल्यामुळें पिलाचे डोळे गरगरां फिरले. आपल्या नाजूक पंखांचा फडफडाट करून त्यानें उठण्याचा प्रयत्न केला.

प्रथम बापानें धक्का देऊन आपल्या चोंचीचा घाव पिलाच्या उरांत घातला. घास भरवणाऱ्या आईनें दुसरा घाव मारला.

वेदनेच्या तडफडीनें पिलूं कसें तरी आपल्या मारेकऱ्यांच्या तावडींतून सुटलें व धडपडत कौलाराच्या कांठाशीं दबून बसलें.

पिलाचे पंख रक्तानें माखून निघाले होते. त्याच्या सर्वांगाला कंप सुटला होता. पिलूं सुटलेलें पाहातांच त्याच्या आईबापांनीं कलकलाट केला. तो ऐकतांच पिलाचे इतर जातभाई रागारागानें धावून आले व त्यांनीं पिलाला पूर्णपणें घेरलें. "माझा अपराध काय? मीं असं केलं तरी काय?" पिलूं भयभीत होऊन ओरडलें.

"तूं बाटलास. तूं त्या माणसाच्या पोराला बिलगलास; पक्षीजातीचा कायदा तूं मोडलास."

वीस पंचवीस चोचींतून संतापाचे उद्गार निघाले व त्या गरीब पिलाच्या कोमल शरीरावर एकदम कित्येक प्रहार झाले.

तिकडे मुलालाही त्याच्या आईबापांनीं फरफटून नेलें होतें. पण त्यांना हिसडून "माझं पांखरूं—माझं पांखरूं—" म्हणून ओरडत तो घराच्या कौलारावर चढला. त्याला बघतांच घाबरून पिलाचे सर्व जातभाई उडून गेले. पिलाचे आईबापही शेवटचा घाव घालून निघाले.

पांखरूं आपल्याच रक्तांत न्हाऊन गेलें होतें.

"माझं पांखरूं—माझं पांखरूं—" म्हणून ओरडत मुलगा छपराच्या अगदीं कांठापाशीं आला. एका फाट्यावर पाय देऊन पांखरूं मोठ्या कष्टानें तोल संभाळीत होतें.

मुलाला बघतांच मरणोन्मुख झालेल्या पांखराचे निस्तेज डोळे क्षणभर चमकले. असहायपणें तें एकदा हसलें व लागलीच निर्जीव होऊन खालीं घरंगळलें.

पिलाचे आईबाप जवळच गवतावर आपल्या रक्तानें माखलेल्या चोची पुसत होते!

मुलाचे आईबाप डोळ्यांतलीं आसवें टिपून काढीत होते!

वास्तविक पाहातां "डड् अँड ब्लॉकहेड" कंपनींत साठ रुपड्यांवर टायपिस्ट असलेल्या माणसाला एवढा थाट शोभत नाहीं. पांढऱ्या रेघांचा निळा गरम सूट [ किंमत रुपये साठ ], साडेतीन रुपयांचा टाय् आणि तकतक करणारे तेरा रुपयांचे शूज् कोणत्या टायपिस्टनें वापरले आहेत ? आणखी त्याची काय छाती आहे पुन्हा असले कपडे करण्याची ? कॉलेजांतल्या बादशाही वैभवाचे ते नुसते अवशेष आहेत एवढेंच.

तो जेव्हां हे कपडे घालून मिरवत असे — त्याला फार दिवस लोटले नाहींत, सारीं तीन वर्षं ! — तेव्हां तो अगदींच निराळा माणूस होता. चांगल्या चांगल्या एम. ए. पीएच्. डी. प्रोफेसरांची तेव्हां तो भंबेरी उडवीत असे आणि आजकाल दिवसाकांठीं जितके तास तो मानेवर खडा ठेवून टाईपरायटरवर बसतो, त्याच्या एक दशांश तास सुद्धा तेव्हां तो कधीं अभ्यासासाठीं बसला नाहीं. डि'सासाहेब खेकसले, म्हणजे ज्या लाचारीनें तो हसतो त्याचा त्याच्या पूर्वीच्या उद्धट हास्याशीं कांहींएक संबंध जोडतां येणार नाहीं ! अशा रीतीनें हसण्याची कला त्यानें अगदीं आजकाल पैदा केली आहे.

तेव्हां त्याचा आत्माभिमान आणि आशावाद दोन्ही जबर होतीं. त्याला वाटायचें, आपण काय होणार नाहीं ? — काय वाटेल तें होऊं ! जेव्हां तो कॉलेजच्या सोशल-गॅदरिंगचा सेक्रेटरी झाला [ आणि जेव्हां त्यानें साठ रुपयांचा सूट केला ! ] तेव्हां तर त्याला हिंदुस्थानची गव्हर्नरी ही सुद्धा मोठीशी गोष्ट वाटत नव्हती ! झाकली मूठ उघडण्यापूर्वींच एका श्रीमंत मुलीशीं लग्न करण्याविषयीं त्याच्या गरीब पण दूरदर्शी बापानें त्याला गळ घातली तेव्हां त्याला तो भयंकर अपमान वाटला. लग्न करणें म्हणजे आपलें उज्ज्वल भवितव्य धोक्यांत घालणें आहे, भविष्यकाळच्या शक्यतांना हरताळ फासण्यासारखें आहे असें तेव्हां त्याला खात्रीपूर्वक वाटत होतें !

अर्थात् आज त्याला तसें वाटत नाहीं. खाणावळीच्या अन्नाचा आतां त्याला कंटाळा आला आहे. आपल्या खोलीची साफसूफ आपणच करतांना त्याला मुळींच उत्साह वाटत नाहीं. सिनेमाहून रात्रीं एकटें परत आल्यावर खोलीचा भयाण एकान्त आणि घड्याळाची टकटक ही त्याला असह्य वाटतात.

येणाऱ्या जाणाऱ्या तरुण मुली आपल्याकडे उपहासानें पाहून पुढें चालल्या आहेत असा त्याला उगीचच भास होतो. कॉलेजांत असतांना ज्या आसक्त उपक्षेनें तो तरुण मुलींकडे पाहूं शकत असे, तसें त्याला आतां त्यांच्याकडे पाहातां येत नाहीं. एखाद्या पराभूत माणसाच्या भेदरटपणानें तो आपल्या डोळयांची भूक भागवण्याचा प्रयत्न करतो — पण त्यामुळें शरीराची व मनाची क्षुधा प्रचंड प्रमाणांत वाढते व तो जास्तच मलूल होतो. दर उन्हाळ्यांत समवयस्क तरुणांच्या लग्नाची सांथ आली कीं तो अगदीं बेचैन होऊन जातो. त्याचे बहुतेक ब्रह्मचारी मित्र आतांपर्यंत कामीं आले आहेत आणि आतां फक्त तो एकटाच काय तो फटिंग उरला आहे !

— आणि बहुतेक तो जन्मभर असाच फटिंग राहाणार ! फोर्टमधून दादरपर्यंत कधीं ट्रॅमनें तर कधीं बसनें तो मरेपर्यंत असाच मरगळून परत येणार, "भिकोबा निवासांत" त्या खोलींत तो असाच पिचत पडणार आणि "बकासुर भुवनांत" त्या आदितवारच्या मेजवानीची तो अशीच वाट पाहाणार. कोपऱ्यांतला खुजा, टेबलावरचें घड्याळ आणि विसकटलेला बिछाना ह्याखेरीज त्याच्या खोलींत दुसरें दृश्य त्याला कदापि दिसणार नाहीं. "डड्‌ अँड ब्लॉकहेड" कंपनीकडून मिळणाऱ्या मासिक साठ रुपयांतून वीस रुपयांची मनी-ऑर्डर तो आपल्या म्हाताऱ्या बापाला करणार, चाळीस रुपयांत मुंबईला सपत्नीक संसार शक्य नाहीं हें आपल्या मनाला बजावून सांगणार आणि डि'सासाहेब उर्मटपणें आंगावर खेकसले म्हणजे तो असाच दीनवाणेपणें हसणार ! तो म्हातारा होईपर्यंत आणि मरेपर्यंत हें असेंच चालणार !

त्याला हें सारें कळतें. साठ रुपये मिळवणारा टायपिस्ट रेघांचा गरम सूट आणि तेरा रुपयांचा बूट घालीत नसतो हें देखील त्याला माहीत आहे. पण त्याला कधीं कधीं स्वतःच्या जिण्याची अगदीं किळस येते. डि'सासाहेबाचें तें गुरगुरणें आणि आपले तें लाचार हसणें आठवलें, म्हणजे घाणीनें शरीर भरल्यामुळें यावेत तसे त्याच्या आंगावर शाहारे येतात. त्याला वाटतें, कीं बेशरमपणें दांत विचकणाऱ्या त्या 'डड्‌ अँड ब्लॉकहेड' मधल्या टायपिस्टचा संपर्क सुद्धा आपल्याला नको. त्या अपमानित जिण्यापासून क्षणभर तरी आपली सुटका झालीच पाहिजे. अशा वेळीं तो आपला साठ रुपयांचा सूट,

साडेतीन रुपयांचा टाय व तेरा रुपयांचे तकतकीत बूट चढवतो आणि मग त्याला एक विचित्र आनंद होतो. त्याला वाटतें, ह्या सुटानें आपल्या उमेदी पाहिल्या आहेत, आपला निडरपणा पाहिला आहे, आपलें उद्धट विद्यार्थीजीवन पाहिलें आहे! हा सूट घालूनच आपण पी. एचडी. प्रोफेसरांची टिंगल केली आहे, मनसोक्त हसलों खिदळलों आहोंत आणि "जनरल सेक्रेटरी" चें भाषण करतांना— ह्याच— ह्याच सुटावर कित्येक नजरा खिळल्या आहेत! ह्या कोटावर एके काळीं कॉलेजचीं "क्रेस्ट" होतीं आणि ह्याच कोटाखालीं आपलें हृदय अनंत आशांनीं फुलून धडधडत होतें. त्यावेळीं हिंदुस्थानची गर्व्हनरी म्हणजे आपण कःपदार्थ समजत होतों. श्रीमंत मुलीशीं तेव्हां आपल्याला लग्न कर्तव्य नव्हतें आणि सादर भक्तीनें आपल्याकडे पाहाणारा भजकांचा केवढा तरी तांडा आपल्याभोवतीं वावरत होता!

आज कोणत्याच मुलीला आपल्याशीं "कर्तव्य नाहीं" असें दिसतें आणि मित्रांनीं तर आपली केव्हांच रजा घेतली आहे. वास्तविक सोबतीची आपणाला आज गरज आहे. पण गतवैभवाची साक्ष असलेल्या ह्या सुटाखेरीज आपणाला आज कोणीच सोबती नाहीं. आपली कांहीं काळ कां होईना, पण कायापालट करण्याचें सामर्थ्य फक्त ह्या सुटांत आहे! आंबटशोकी टायपिस्ट म्हणून आपल्याला लोक हसले तरी पर्वा नाहीं, हेवेखोर रागानें डि'सासाहेबानें आपल्याला भाजून काढलें तरी हरकत नाहीं. आपण हा साठ रुपयांचा सूट, साडेतीन रुपयांचा टाय आणि तेरा रुपयांचा बूट जरूर मधून मधून घालणार! प्रश्न इतकाच कीं ह्या सुटाच्या आयुष्यमानाला सुद्धा मर्यादा आहेत. हा सूट फाटल्यावर आपलें कसें होईल? मग आपल्याला स्मृतीच्या स्वर्गांत कसा प्रवेश मिळेल? लाचारपणें हसणाऱ्या त्या "डड्‍ अँड ब्लॉकहेड" कंपनींतल्या भिकार टायपिस्टशीं आपल्याला क्षणार्धांत कशी फारकत करून घेतां येईल?

■ ■ ■

आज त्याला जास्तच खिन्न आणि एकटें वाटत होतें. दर महिन्याला त्याच्याकडून वडिलांना वीस रुपयांची मनीऑर्डर गेली कीं मासिक उपदेशाची एक मात्रा त्याला ते पाठवून देत असत. ही त्यांची जुनीच खोड होती, पण पूर्वी उपदेशाबरोबर त्यांच्याकडून पैसे येत असल्यानें त्याला

उपदेश पचविणें फारसें जड जात नसे. आतां पैसे तो पाठवीत असे आणि उपदेश ते करीत असत. असा उलटा मामला झाला होता !

त्यांच्या मासिक उपदेशाचा विषय आजकाल एक व एकच असे आणि तो म्हणजे लग्न !

साठांतून वीस गेले म्हणजे चाळीस राहातात आणि चाळीस रुपयांत पंधरा माणसांचें कुटुंब आपण खुद्द पोसलें आहे असा त्यांचा लग्नातर्फे पहिला मुद्दा होता. त्यांचा दुसरा मुद्दा म्हणजे पहिल्या मुद्यावरून गणितानें सिद्ध होणारा छोटा उपसिद्धान्त होता. चाळिसांत जर पूर्वी पंधरा माणसें पोसलीं जात, तर आतां निदान दोन पोसलीं जायला काय हरकत आहे ? ह्या खेरीज मुंबईत तरुण माणसानें एकटें राहाणें बरें नव्हे, एकदा लग्नाऊ मुलांच्या यादींतून नांव खोडलें गेलें कीं तें प्रकरण फार कठीण होऊन बसतें, बायकोशिवाय आयुष्य म्हणजे स्मशान, वगैरे !

तुमच्या काळीं टॉकीज् नव्हत्या, “ डड् ॲन्ड ब्लॉकहेड ” मधल्या बेभरवशाच्या नोकऱ्या नव्हत्या आणि एका गचाळ खोलीचें पंधरा रुपये भाडें तुम्हांला द्यावें लागत नव्हतें असें आपल्या वडिलांना एकदा उत्तर धाडावें असें त्याच्या कधीं कधीं मनांत येई, पण पत्रांतून सुद्धा वाद घालण्याइतकी रग त्याच्यांत आतां शिल्लक नव्हती. विवाहित आयुष्याचीं त्याच्या पिताजींनीं पत्रांत वारंवार काढलेलीं मोहक चित्रें पाहिलीं म्हणजे त्याला जास्तच भयंकर व एकाकी वाटूं लागे.

आज त्याला तसेंच वाटत होतें. खोलींतलें तें राधाकृष्णाचें कॅलेंडर, तो खुजा, त्या कपबशा, सारीं जशीं त्याला खायला उठलीं होतीं. बाहेरच्या रहदारीचा आवाज त्याला बिलकूल सहन होत नव्हता. खोलींतला सूर्यप्रकाश सुद्धा नकोसा झाला म्हणून त्यानें दारें लावून टाकलीं. पण नंतर झालेल्या गर्द अंधाराची त्याला इतकी भीति वाटली, कीं त्यानें तीं धडाधड खुलीं केलीं. एखाद्या ताणलेल्या तारेसारखें त्याचें मन आज नाजूक व कंपप्रवण झालें होतें.

बायकोशिवाय आयुष्य स्मशानासारखें आहे अं ? किती तरी बायका आहेत ह्या जगांत ! शेकडों – हजारों – लाखों ! किती तरी रोज माझ्या जवळून जातात, किती तरी माझ्या आसपास वावरतात, कांहींना मी ओळखतोंही ! पण

माझ्या अगदीं हाताशीं असणारी ही स्त्रियांची सृष्टीच्या सृष्टि माझ्या कधीं हातीं मात्र लागणार नाहीं. मी आजारी पडलों, रक्तबंबाळ झालों, मेलों तरी कोणत्याही स्त्रीला त्याचें सोयरसुतक असणार नाहीं. कोणीही माझ्यासाठीं रडणार नाहीं! कोणीही माझ्यासाठीं दुःख करणार नाहीं! माझा हा सारा जन्म—सबंध आयुष्याच्या आयुष्य अगदीं असेंच निघून जाणार! बायकांचें जग न पाहातांच मी मरणार! सोबतीशिवायच माझें आयुष्य बरबाद होणार!

नुसत्या कल्पनेनें त्याच्या कपाळावर घामाचे थेंब दिसूं लागले. त्याला वाटलें, आपलें मन रोगट झालें आहे. आपल्याला अशानें वेड लागेल. छट्! आज आपल्याला टाईपरायटरशीं बसून कर्मकटकट करणें शक्यच नाहीं. डि'सा-साहेबांची शिवीगाळ सहन करण्याच्या स्थितींत आज आपलें मन नाहीं. ऑफिसांत जाऊन आजचा दिवस आपण रजा घेतलीच पाहिजे आणि जातांना तो साठ रुपयांचा सूट, तेरा रुपयांचा बूट आणि साडे तीन रुपयांचा टाय्...

■ ■ ■

एक दिवस मिळालेल्या रजेमुळें असो कीं डि'सासाहेबाकडून त्या रजेबरोबरच मिळालेल्या शिव्यांमुळें असो कीं पांढऱ्या रेघांच्या त्या निळ्या सूटमुळें असो, ऑफिसच्या पायऱ्या उतरून म्युझियमच्या ट्रॅम स्टेशनकडे येतांना त्याचें मस्तक विलक्षण रीतीनें झिणझिणूं लागलें. त्यानें आजूबाजूला पाहिलें. "कॅफे रॉयल्" मध्यें कॉलेज विद्यार्थी-विद्यार्थिनींचा एक घोळका हसत खिदळत बसला होता. जवळच थांबलेल्या बसमधून एक पारशी एका नाजूक तरुणीला हात देऊन उतरवून घेत होता. समोर म्युझिअमच्या फाटकांत एक महाराष्ट्रीय कुटुंब शिरत होतें. अपोलो बंदरजवळ समुद्राचें पाणी मंद हेलकावे खात होतें, झाडांच्या माना डोलत होत्या, जगांत सर्वत्र आबादी आबाद होती!

त्यानें रस्त्यावरच्या विलक्षण रहदारीकडे पाहिलें. त्याचें मस्तक अधिकच झिणझिणूं लागलें. केवढी अफाट आहे ही मुंबई! हे इतके लोक जातात तरी कुठें? खुजा आणि कॅलेंडर असलेल्या खोलींत? कीं आदितवारीं फीस्ट देणाऱ्या "बकासुर-भुवनांत?" ट्रॅममध्यें आणि बसमध्यें एकमेकांच्या अगदीं शेजारीं बसणारीं हीं माणसें परस्परांशीं एक शब्दही न बोलतां खुशाल निघून

कशीं जातात ? आयुष्यांत त्यांची पुन्हा कधीं तरी गांठ पडते का ? भेटूं म्हटल्यानें तरी त्यांची पुन्हा भेट होईल काय ? आपण आज रजा कां घेतली? ह्या सबंध दिवसाचें आपण काय करणार ? ह्या निळ्या सूटची जादू अजून लागू कां पडत नाहीं ? आपल्याला इतकें उदास आणि उजाड कां वाटतें ?

त्याचे विचार वाटेल तसे सैरावैरा धावत होते. त्याच्यासमोर पांच नंबरची कोरी करकरीत ट्रॅम येऊन उभी राहिली. तिच्यांतल्या खालच्या मजल्यावरच्या एका समोरच्या बाकावर त्यानें देह टाकून दिला. त्याच्या मागच्या बाजूला एक गोरीपान बाई नवऱ्यासकट बसली होती आणि तीं दोघें एकमेकांच्या कानांत कांहीं तरी बोलत होतीं. त्यांच्या डाव्या बाजूला कांहीं कोळणी बडबडत होत्या व त्यांच्या मागें दोन मळकट मुसलमान बसले होते. सारी ट्रॅम चिकार भरली होती. फक्त त्याच्या शेजारची जागा रिकामी होती. चोर पावलांनीं त्याच्या मनांत एक विचार फिरकून गेला — आपल्या शेजारीं आतां कोण बसेल ? ह्या औट घटकेच्या मुशाफरींत आपला साथी कोण ? का इथें सुद्धा आपण एकटेच ? — वाऱ्याचा एक मोठा झोत आला आणि त्याच्या मस्तकांत कसल्या तरी फुलांचा उन्मत्त सुगंध शिरला. शंकाच नको; हा मागें बसलेल्या गोऱ्यापान बाईच्या केशपाशावरचा सुगंध! त्याच्या मनांत कसली तरी विलक्षण उलथापालथ झाली व धडकणाऱ्या हृदयानें तो आपल्या शेजारच्या जागेवर नजर रोखून बसला. फ्लोरा फाउंटनपाशीं त्याच्या मागचें तें जोडपें उतरलें, त्या कोळणी उतरल्या आणि कांहीं गुजराती बाया तेथें येऊन बसल्या. आंत चढलेला एक पठाण त्याच्या शेजारीं आला, थोडा घुटमळला व पलीकडे गेला. कां कोण जाणें, पण आपल्या शेजारची जागा रिकामी राहिल्यामुळें त्याला अनावर आनंद झाला. पेपर्स चांगले गेलेला विद्यार्थी यशाच्या ज्या उत्कंठेनें निकालाकडे पाहातो त्या उत्कंठेनें तो आपल्या शेजारच्या रिकाम्या जागेकडे पाहात होता. त्याच्या मस्तकांत, हृदयांत, सुवास भरला होता. वाऱ्याचे झोत त्याला सुगंधाचे घुटक्यावर घुटके पाजीत होते. त्याच्या अपेक्षा चाळवून सोडणारा तो उन्मत्त सुगंध त्या गोऱ्या बाईच्या वेणीवरून आला होता. त्याचें काळीज वेगानें चालूं लागलें व त्याच्या अंतर्मनाला फक्त एकच शंका व्याकूळ करूं लागली. आपल्या शेजारीं कोण बसणार ? अज्ञात जगांतून येणारी आणि अज्ञात जगांत परत विरून जाणारी ही व्यक्ति कोण असेल ?

कोणाची सोबत आपल्याला मिळणार आहे ?

त्यानें सभोवार पाहिलें. सारी ट्रॅम भरली होती आणि गूढ ललाटलेखाप्रमाणें फक्त त्याच्या शेजारची जागा मात्र रिकामी दिसत होती. आणि त्याच्या वेड्या मनानें कसली तरी विलक्षण अपेक्षा त्याच्यांत उत्पन्न केली होती आणि त्या अपेक्षेचा ताण त्याला कांहीं केल्या सहन होईना ! ट्रॅम बोरीबंदरपाशीं आली तेव्हां तेथील जमाव पाहून त्यानें डोळे घट्ट मिटून घेतले आणि मस्तक हातावर टेकलें.

—बोरीबंदरला गलबला करीत कांहीं लोक आंत चढले व कांहीं उतरून गेले.

—"टन् टन्" अशी घंटा वाजल्यावर "सूंऽऽ" असा आवाज करीत ट्रॅमनें गति घेतली.

—आणि आपल्या शेजारीं आंग चोरून बसण्याचा कोणी तरी प्रयत्न करीत आहे असें त्याच्या लक्षांत आलें.

त्याच्या हृदयाची धडपड शतपटीनें वाढली, मनावरचा ताण किमान मर्यादेला गेला व उत्कंठेच्या आवेशानें त्यानें हातांवर विसावणारें मस्तक वर उचललें !

  

पांढरें शुभ्र गोल पातळ आणि त्याला काळे कांठ ! सावळा लांबट चेहेरा आणि फारसें न भरलेलें शरीर ! मांडीवर पडलेला शाईचा एक ताऱ्यासारखा बारीक डाग ! मास्तरीण असेल का ही ? पण मग अगदींच पोरसवदा आहे आणि विद्यार्थिनी म्हणावी तर आयुष्याची बरीच गांजणूक सहन केलेल्या माणसाचें गरीब गांभीर्य हिच्या चेहेऱ्यावर कुठलें ? असेल आपल्यासारखीच कुणी विचारी ! डोळयांच्या कोपऱ्यांतून त्यानें तिच्या गळयाकडे पाहिलें. तेथें त्याला हिरवी दूड दिसली नाहीं आणि काळी पोतही दिसली नाहीं—फक्त बदामी लॉकेट अडकवलेली एक सोन्याची साखळी दिसली. आणखीही एक गोष्ट त्याला दिसली—ती ही कीं ती देखील त्याच्याकडे डोळयाच्या कोपऱ्यांतून पाहून त्याचा आढावा घेत होती. एकमेकांशीं एक शब्दही न बोलतां परस्परांचा परिचय करून घेण्याची ही उभयपक्षी रीत होती.

— आपण तिला कसे दिसत असूं? एक खुशालचेंडू लक्ष्मीपुत्र — कीं ज्याच्या सारख्याच्या पत्नीपदाची अपेक्षा तिनें स्वप्नांतही करूं नये? का एक उनाड गांवगुंड — कीं ज्याच्या शेजारीं नाइलाज म्हणून तिनें आंग चोरून बसावें? त्यानें बाजूच्या निळ्या काचेंत अभावितपणें पाहिलें. काय आश्चर्य! सिनेमांतल्या नायक-नायिकांचीं "प्रोफाइल्स" एखाद्या लाडक्या "पोज" मध्यें दिसावींत तशीं त्यांचीं प्रतिबिंबें त्या काचेंत एकमेकांना बिलगून पडलीं होतीं. त्याच्या मनांत अचानक एक कल्पना आली व त्याचें सारें आंग शहारून निघालें. त्यानें मुद्दामच मागें वळून पाहिलें!

— होय कीं! आतां त्यांच्या मागें येऊन बसलेला एक प्रेमळ पारशी किती कौतुकानें त्याच्याकडे पाहात होता. त्याला असें का वाटलें — कीं — कीं —! त्यानें मान वळवली आणि त्याच्या लक्षांत आलें कीं ती देखील काचेंत शेजारीं पडलेल्या परस्परांच्या प्रतिबिंबांकडे पाहात आहे. म्हणजे, आपलें मनोगत हिला तत्काळ कळावें इतकी का सहसंवेदना तिच्यांत आणि आपल्यांत उत्पन्न झाली आहे?

तो नजर चळूं न देतां तिचें आपादमस्तक निरीक्षण करूं लागला. त्याचे डोळे समोर होते पण दृष्टि तिच्यावर होती. प्रेमांत पडणारे लोक असेंच विलक्षण रीतीनें पाहात असल्याचें त्यानें वाचलें होतें. तो कधीं प्रेमांत पडला नव्हता पण ती तरी पडली असेल का कधीं प्रेमांत? तिचेही डोळे समोर होते, पण दृष्टि कोठें होती? त्याच्यावर होती का?

— त्याचें निरीक्षण पुढें चालू झालें. पायांत साध्या चपला — उंच टांचेचे बूट नाहींत, केसांची सुंदर वेणी — शेपटा नाहीं — चेहेरा किती सौम्य — लिपूस्टिक् किंवा पावडर नाहीं! साधी, सरळ पोर!

"क्राफट मारकीट — क्राफट मारकीट!" कंडक्टरनें गिल्ला केला. तिनें किंचित् हालचाल केली. तो एकदम भयभीत झाला. त्याला वाटलें कीं ही आतां शेजारीं रिकाम्या झालेल्या जागेवर जाऊन बसणार किंवा संतापून खालीं उतरणार. आपल्याला अशीच शिक्षा पाहिजे. तरुण मुलीला इतकं निरखणं हें काय संभावितांचं काम झालं?

अत्यंत अनुनयाच्या दृष्टीनें त्यानें तिच्याकडे पाहिलें. त्याचे डोळे म्हणत होते, "मला क्षमा करा. मी पुन्हा असं करणार नाहीं. मला कृपा करून

नीच समजूं नका ! " पण त्याची भीति व्यर्थ होती — ती ट्रॅममधून खालीं उतरली नाहीं किंवा रिकाम्या झालेल्या दुसऱ्या जागेवरही ती गेली नाहीं. उलट त्या रिकाम्या जागेकडे येणाऱ्या एका रोहिल्याला चुकविण्यासाठीं ती किंचित् त्याच्याकडेच सरकली व नंतर तशीच गंभीरपणें बसून राहिली.

त्यानें मनांतल्या मनांत तिच्याविषयीं आणखी एक टीप मारली, " पुरुषांच्या जवळ बसण्यांत आपण त्यांच्यावर मोठा अनुग्रह करतों, असं समजण्याइतकी ही मुलगी शिष्ट नाहीं किंवा संधि मिळतांच बाक बदलण्याइतकी फाजील पतिव्रताही नाहीं. ही एक चांगली, सरळ सोबतीण आहे. "

सुखसागराच्या लाटांवर आपण तरंगत जात आहोंत असें त्याला वाटूं लागलें. त्याच्या मनांत धुमसणारी आग हळूहळू थंड पडली होती. असला शांत आनंद त्यानें कधींच अनुभवला नव्हता. त्यानें पूर्ण निश्चिंतपणें ट्रॅमभर दृष्टि फिरवली. त्याला वाटलें लोकांच्या नजरा आपणा दोघांकडे लागल्या आहेत आणि त्या नजरांत एकच साभिप्राय कौतुक आहे. त्याची दृष्टि पुन्हा एकदा कांचेंत पडलेल्या त्याच्या प्रतिबिंबाकडे गेली. निळ्या सुटांत आपण इतके चांगले दिसत असूं अशी त्याला कल्पना नव्हती आणि तिच्या श्यामल आकृतीला पांढरें पातळ कांहीं कमी खुलून दिसत नव्हतें ! शिवाय आपलीं " प्रोफाईल्स " तरी किती तरतरीत दिसतात ! आपलें कधींकाळीं लग्न झालें तर आपण ह्याच " पोज " मध्यें फोटो काढायचा का ?

— " भेंडी बाजार — " म्हणून ट्रॅमकंडक्टरनें आरोळी ठोकली व त्याच्या मागें आतां दोन मवाली येऊन बसले. संरक्षणाचा जबाबदारी ओळखणारा त्याच्यांतला पुरुष जागा झाला आणि आपला डावा हात बांकाच्या पाठीवर लांबवून तो तिच्याकडे चोरट्यासारखा पाहूं लागला. मान खालीं घालायला निमित्त मिळावें म्हणून मांडीवरच्या पुस्तकांत तिनें तोंड दडवलें. स्वाधीन झालेल्या कोंकरासारखी ती त्याच्या पसरलेल्या हाताच्या आसऱ्याला आली होती. निदान त्याला तरी असेंच कांहींसें वाटलें. ट्रॅमचा वेग कमी अधिक झाला म्हणजे बसणाऱ्या धक्कयानें तिच्या शरिराचा त्याला स्पर्श होत होता व त्या निसटत्या स्पर्शाच्या शीतल अग्नीनें त्याचा देह भाजून निघत होता आणि तरीही त्या स्पर्शाविषयींचा त्याचा हव्यास मात्र वाढत होता !

त्याच्या मनांत आनंदाचा कल्लोळ माजला! रुळावरून सफाईनें सरकत जाणाऱ्या ह्या ट्रॅमचा प्रवास कधीं संपूंच नये असें त्याला वाटत होतें. त्याची नजरच बदलली होती. रस्त्यावर भटकणारे चिनी फेरीवाले त्याला चांगले सुंदर वाटत होते. रस्त्यावरची रहदारी लग्नाच्या मिरवणुकींतल्या वऱ्हाडाइतकी खुषींत आहे असा त्याचा अभिप्राय होता आणि ट्रॅमगाडी म्हणजे वरातीच्या मिरवणुकींतलें नवरानवरीचं बादशाही वाहन आहे ह्याविषयीं तर त्यानें पैज मारली असती!

आतां डि'सासाहेब त्याच्या खिसगणतींतही नव्हता. टाईपरायटर नांवाचें विचित्र यंत्र अस्तित्वांत आहे, ह्याविषयीं त्याला बिलकुल दखल नव्हती आणि आपल्या खोलींतल्या खुजाचा त्याला पार विसर पडला होता! आकाशांतून तो तरंगत जात होता व त्याच्या डाव्या बाहूवर त्याची सोबतीण विसावत बसली होती एवढेंच काय तें खरें होतें व एवढेंच काय तें महत्त्वाचें होतें. प्रचंड भावना निःशब्द असतात. तो तिच्याशीं एक शब्दही बोलला नव्हता आणि तरीही तिच्या आणि त्याच्या भावनांचा एकच सूर लागला होता. ट्रॅमच्या चाकांचें संगीत किती मधुर होतें! त्याचें आजपर्यंतचें आयुष्य किती निर्जीव व गतिहीन होतें; आणि आतां भावनांच्या कसल्या विविध आवर्तांतून तो फिरत होता! दृष्टिभेट—सहानुभूति—सहसंवेदना आणि सोबती! आणि हें सारें तिचें नांव सुद्धा माहीत नसतांना!

—"जे. जे. हॉस्पिटल! जे. जे. हॉस्पिटलवाला उतर जाव" कंडक्टर उंच आवाजांत दोनदा ओरडला. जे. जे. हॉस्पिटल! अजून पुष्कळ अवकाश आहे. हा आपल्या सह-प्रवासाचा मध्यबिंदू आहे. पण हिचें नांव काय? हिचें नांव सुद्धा कळणार नाहीं का आपल्याला? त्याच्या मनांत हा विचार जोरानें आला व तिनें आपल्या हातांतील पुस्तकाचें कोरें पान उलटवलें.

'K. J.'! त्या पानांवर नुसतीं इंग्रजी आद्याक्षरें लिहिलीं होतीं. के. जे. म्हणजे? कुसुम जोशी? कमला जयकर? कृष्णा जाधव. सहप्रवासांतल्या सोबत्यांना एकमेकांचीं कोडीं उलगडण्यांत इतका आनंद वाटतो का?

संगतीच्या सुखाला उत्कंठेची गोडी ह्यामुळेंच येते का ? आणि हें काय ? आपल्या छत्रीकडे तिची नजर कां लागली आहे ?

—'रंगराव पिटके'! त्याच्या छत्रीवर पांढऱ्या अक्षरांत लिहिलें होतें.

—तिचे डोळे त्या अक्षरांवर फिरतांना पाहून जीवाची बाजी लागल्यासारखा तो घाबराघुबरा झाला. त्याला वाटलें, आपण खूप मोठ्यानें ओरडून तिला सांगावें–नाहीं, तें माझं नांव नाहीं! मला तें नांव मुळींच आवडत नाहीं! ती छत्री मीं उसनी आणली आहे! माझं नांव इतकं वाईट असेल, असं का तुम्ही समजतां ? ती छत्री माझी असती, तर माझ्या पूर्ण नांवाचें गुपित करून मीं सुद्धा तुम्हांला कोड्यांत पाडलं असतं. पण त्या पिटक्याला अक्कल कशी ती नाहींच!

—त्यानें तिच्याकडे सभयपणें पाहिलें. तिच्या तोंडावर नापसंतीचा लेशही नव्हता. हातांतील पुस्तक तिनें मिटून घेतलें होतें आणि ट्रॅमड्रायव्हरच्या फेट्याकडे तिचे डोळे लागले होते. डब्यांतल्या डब्यांत व्यापार करूं पाहाणाऱ्या एका माणसानें त्यांच्यापुढें अबोलीच्या फुलांची लाल वेणी धरली, तेव्हां तिची असंमति घेण्यासाठीं तिच्यावरून नजर फिरवल्याचें सोंग करीत त्यानें त्या माणसाला माननेंच नकार दिला. अस्सं! म्हणजे एकूण त्या वेणीवाल्याला देखील वाटत होतें कीं ... !

—"रानी बा–ग! रानीबाग उतर जाव!" कंडक्टर किंकाळला. तो एकदम दचकला. राणीबाग इतक्या लवकर येईल अशी त्याची अपेक्षा नव्हती. तीक्ष्ण शस्त्राचा घाव झाल्यासारखें त्याचें हृदय त्या शब्दांनीं भेदून निघालें. आपली सोबत सुटणार. आतां आपली संगत तुटणार.

एकमेकांच्या शेजाराला बसल्यानें आपल्यांत किती ऊब उत्पन्न झाली आहे! त्या उबेंतून आतां आपण परत बाहेर फेकले जाणार,–अगदीं एकटे! आपल्या हाताला तिचें मस्तक पुन्हा कधींही लागणार नाहीं! ही ट्रॅम एखाद्या राक्षसीसारखी कां अंतर खाते आहे ? मध्येंच एखादा नळ फुटून रस्त्यावर पाणीच पाणी कां होत नाहीं ? आतां लवकरच लालबागचें घड्याळ दिसेल, मग परळ येईल आणि मग आपल्या प्रवासाचा अंत!

—तो एखाद्या अधाशासारखा तिच्यावरून नजर फिरवूं लागला. तिच्या पांढऱ्या पातळावरचा तो शाईचा डाग, त्या चपला, ती वेणी, तो सावळा

लांबट चेहेरा आणि ती फारशी न भरलेली देहयष्टी! त्याचें मन त्याला निकरानें सांगत होतें — पाहून घे! नीट पाहून घे आणि सारं नीट लक्षांत ठेव! जन्मभर तुला विसर पडणार नाहीं इतकें आतांच पाहून घे!

ट्रॅम कंडक्टर "लालबाग" म्हणून ओरडला तेव्हां पेपर द्यायला पांचच मिनिटें उरावींत आणि प्रश्न मात्र अपुरेच राहावेत, म्हणजे एखाद्या विद्यार्थ्याला जसें होईल तसें त्याला झालें. तो तिच्याकडे सारखा पाहात होता आणि तिचा प्रत्येक अवयव आपल्या स्मृतींत नमूद करीत होता. त्याच्या पायांना कंप सुटला आणि सर्वांगाला घाम आला. त्याचें हाःहाःकार करणारें मन आक्रंदून म्हणूं लागलें–तिची आणि तुझी सोबत संपली. ती आतां तुला पुन्हा कधींही दिसणार नाहीं. ह्या अफाट शहरांत ती पार नाहींशी होईल. झपाट्यानें जाणारे हे क्षण पुन्हा कधींही परत येणार नाहींत, तिचें नांव सुद्धा न समजतां तूं तिचा निरोप घेशील!

कंडक्टरनें "परळ" आल्याची ललकारी दिली तेव्हां तो जवळ जवळ निचेष्ट अवस्थेंत होता. एखाद्या मरूं घातलेल्या माणसासारखा! एवढ्याशा प्रवासांत जणूं आयुष्यभराचीं सुखदुःखें त्यानें पाहिलीं होतीं. भेट, सोबत आणि ताटातूट!

दुरून दादर ट्रॅम-स्टेशन दिसूं लागलें, तेव्हां तिचें नांव विचारण्याची अनिवार धडपड त्याच्या मनानें केली. पण त्याचे ओठ हालले नाहींत. भरल्या संसाराचा निरोप घेणाऱ्या माणसाच्या डोळ्यांनीं तो तिच्या अवनत मस्तकाकडे टक लावून पाहात होता.

— ट्रॅम थांबली व त्या धक्कयानें त्याचा हात तिच्या खांद्यावर पडला. Good bye ! good bye! Thus we part ! मोठ्या कष्टानें तो उभा राहिला. सारें जग त्याच्या डोळ्यांसमोर वाकडें तिकडें फिरत होतें. तिला शोषूं बघणारी शेवटची नजर त्यानें तिच्यावर लावली. त्याला वाटलें तिचे ओठ कांपत आहेत, डोळे ओलावून आले आहेत! त्याला कळलें, कीं अनावर हुंदक्यांमुळें आपलाही दम कोंडून निघाला आहे! तो तसाच धडपडत खालीं उतरला. उतरतां उतरतां त्याच्या मनानें कोलाहल करून त्याला म्हटलें, 'तिचं नांव! फक्त तुझ्या सोबतीणीचं नांव!'

तिच्याबरोबर ‘ किंग्स सर्कल ’ पर्यंत जाण्याचा विचार त्याच्या बधिर मनांत येऊन गेला. पण तशी कृति त्याच्या हातून घडली नाहीं. आभासमय स्वप्नांचा अंत न पाहाण्याविषयीं त्याला कोणीतरी गंभीर स्वरांत बजावून सांगत होतें!

कोठेंतरी वाचलेल्या कवितेच्या ओळी त्याला आठवल्या.

This is the way the world ends

Not with a bang but with a whimper!

—‘ टन् ’ अशी ट्रॅमची घंटा वाजली ती त्याला अस्पष्ट ऐकूं आली. कांहीं लोकांच्या पुसट आकृति घाईघाईनें आंत चढत असल्याचें दृश्य त्यानें पाहिलें व ट्रॅम हळूहळू त्याच्या डोळयांपुढून सरकूं लागली.

डोक्यावरची टोपी हातांत घेऊन क्षणोक्षणीं दूर जाणाऱ्या ट्रॅमकडे पाहात तो भंगलेल्या आवाजांत म्हणत होता. ‘Good bye, good bye for ever.’

त्याचें मन पुन्हा ओरडून उठलें—

‘ पण तिचं नांव! फक्त तिचं नांव ! ’

# हेमांगिनीचें प्रेम

हेमांगिनीनें राघवेंद्र रानड्याच्या नांवें प्रेमाचें नवें खातें खोललें, तेव्हां तिनें पुनरपि सूर्य, चंद्र, पृथ्वी, तारे, आकाश, इत्यादि निरुपद्रवी मंडळींना निकडीचें निमंत्रण धाडलें. सूर्य, चंद्र, आकाश वगैरेंना हेमांगिनीपासून आजपर्यंत अतिशय उपसर्ग पोहोंचला होता. परंतु आपल्या प्रेमाला त्यांची साक्ष ठेवल्याशिवाय तिला चैनच पडत नसे, त्याला काय करावयाचें ? एवढा उन्हाळ्यांत माणसांना बेदम करणारा सूर्य आणि एवढा चांदण्या रात्रीं चोरांना व प्रणयी-जनांना घाबरें करून सोडणारा चंद्र, पण हेमांगिनीनें त्यांना अगदीं दीन करून त्यांची अनेकदा गठडी वळली होती. आजपर्यंत एकूण पांच वेळां तिनें ह्या असहाय मंडळींची बाही धरून त्यांना आपल्या प्रेमाचे साक्षीदार म्हणून फरफटत नेलें होतें. आज त्यांच्यावर हेमांगिनीचें पकड-वॉरंट जाण्याची ही सहावी वेळ !

मॅट्रिक पास व्हावयास हेमांगिनी अतिशय उत्सुक होती ह्याचें कारण तिची ज्ञानलालसा, असें प्रामाणिकपणें म्हणतां येणार नाहीं. शिक्षण तांतडीनें संपवून तिला आपल्या म्हाताऱ्या आईचे व भुकेल्या भावंडांचे पांग फेडावयाचे होते म्हणावें, तर तशांतलीही कांहीं गोष्ट नव्हती. तिला आई नव्हती, भावंडें नव्हतीं आणि बाप होता तोही असून नसल्यासारखाच होता. म्हणजे आपल्या एकुलत्या एक लाडक्या लेकीचे कान योग्य वेळीं उपटून हातांत देईल इतक्या ताकदीचा तिचा बाप नव्हता. नाहीं तर रूपानें बऱ्यापैकीं असणाऱ्या हेमांगिनीला परीक्षेच्या मांडवांत जाऊं देण्याऐवजीं त्यानें तिला केव्हांच लग्नाच्या मांडवांत पिटाळलें असतें. पण रावसाहेब चित्रे म्हणजे चमत्कारिक वल्ली होती. अगदीं भलत्या वेळीं ते माथ्यांत राख घालून आरडाओरड करायचे आणि नाहीं तेव्हां खुशाल एखादी कादंबरी रवंथ करीत आरामखुर्चीवर झोपीं जायचे ! त्यांच्या असल्या गलथानपणामुळेंच हक्काच्या नवऱ्याला व्याख्यानें पाजण्यास सासरीं जाण्याऐवजीं, मूर्ख प्रोफेसरांचीं व्याख्यानें ऐकायला हेमांगिनी कॉलेजांत जाऊं शकली.

पण हेमांगिनी मोठ्या ईर्षेनें मॅट्रिक पास झाली, ती कांहीं थंड्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्यासाठीं नव्हे. तिनें वाचलेल्या मराठी कथावाङ्मयांत तिला असें

आढळून आलें होतें कीं काव्यमय व रोमांचकारी प्रेम करण्याची कोठें उत्तम सोय केलेली असेल तर ती कॉलेजांतच. तेथला तो संमिश्र विद्यार्थीवर्ग, तें नवथर पहिलें प्रेम, तें पुस्तकांतून उघडलेलें प्रेमाचें टपालखातें, तीं प्रेमाला पोषक होण्यासाठीं उत्पन्न झालेलीं वार्षिक संमेलनें, ते विद्यालयाच्या 'प्रांगणां' तले लताकुंज, ती पहिल्या स्पर्शामुळें एखाद्या पिठाच्या गिरणीसारखी होणारी हृदयाची धडधड आणि सर्वांत महत्त्वाची आणि रोमांचकारी बाब म्हणजे तो म्हाताऱ्या आईवडिलांचा आणि समाजाचा प्रणयी-जनांस होणारा राक्षसी विरोध, त्यांचें तें दिव्य प्रेमाच्या मार्गांत आडवें पडणें आणि...अखेर... अखेर...अखेर!! त्या साऱ्या सैतानी शक्तीस तुडवून होणारा खऱ्या प्रेमाचा उदय, उत्कर्ष व विजय, दुसऱ्या वर्गानें केलेला मधुचंद्राचा प्रवास, विजेच्या दिव्यांचीं दाबलेलीं बटणें, इत्यादि...इत्यादि!

कांहीं काळ कथावाङ्मयास कुलूप घालून हेमांगिनीनें तिसऱ्या वर्गांत प्रवेश-परीक्षेचा पैलतीर गांठला, तो विद्यालयांत मिळणाऱ्या ह्या रोमांचकारी अनुभवासाठीं! कॉलेजच्या पहिल्या तीन वर्षांत तिनें मोसमास दीड ह्या अभिमानास्पद गतीनें प्रकरणें रंगविलीं. चौथ्या वर्षाच्या पहिल्या महिन्यांत आणखी एका अर्धवटाला तिनें निकालांत काढला आणि त्याच वर्षाच्या तिसऱ्या महिन्यांत तिनें कॉलेजच्या 'प्रांगणांतील' लताकुंजांत राघवेंद्र रानड्याच्या बटबटीत डोळ्यांवर स्वप्नाळूपणें आपली नजर भिडवून पुनरपि सूर्यचंद्रास पाचारण केलें!

लताकुंजाच्या ह्याच कत्तलखान्यांत तिनें वासू परांजपे ह्या प्रथम वर्षांतील भोळ्या कोकरास तीन वर्षांपूर्वी आणलें होतें. वासू देखणा होता, हळवा होता. त्याची काव्यांत गति होती, त्याची अभ्यासांत गति नव्हती, त्याची शरीरप्रकृति नीट वागत नसे, तो दरिद्री होता, तो हेमांगिनीच्या जातीचा नव्हता, थोडक्यांत म्हणजे सारें कांहीं असावयास पाहिजे होतें, तसेंच होतें! अडचणींचा पर्वत हेमांगिनीच्या डोळ्यांस भेडसावीत होता. पण तिचें धैर्य खचलें नाहीं. तिच्या प्रेमांत अंतराय आला नाहीं. उलट संकटें, रूढि व बाप ह्यांच्याशीं खऱ्या प्रेमाच्या नांवानें झगडण्यासाठीं ती बद्धपरिकर झाली. बंडखोरीच्या रोमांचकारी कल्पनेनें तिचा आत्मा 'मोहरून' निघाला. —पण अरेरे! अखेर वासू परांजपे कमालीचा कमकुवत ठरला! कानटोपी

घालणाऱ्या कोकणी बापाच्या एकाच अनुनासिक गर्जनेनें प्रेमाच्या गुलाबी रंगांत न्हालेला वासू पांढरा फटफटीत पडला व अगदीं अल्पवयांतच त्यानें एका सजातीय पोरीशीं लग्न लावून 'हाराकिरी' केली. लग्नोत्तर प्रेम आणि कठोर कर्तव्य ह्या विषयावर एक काव्यमय पत्र हेमांगिनीस पाठवून देण्याचा निर्लज्जपणा करावयास मात्र तो चुकला नाहीं !

झालें, हेमांगिनीच्या पहिल्या प्रेमाची वासलात ही अशी लागली ! चार दिवस ती रडली, पडली, वेणीफणीकडे तिनें दुर्लक्ष केलें, सिनेमांतल्या विफलप्रेम नायिका ज्या भकास तऱ्हेनें हसतात तशी ती हसूं लागली. एवढेंच काय, पण गणमात्रांशीं विशेष ओळख नसतां त्राग्याच्या भरांत तिनें कांहीं सुनीतें सुद्धा रचून काढलीं ! पण एक गोष्ट मात्र मान्य केलीच पाहिजे. वंचनेच्या त्या प्रळयांतही तिला एक तऱ्हेच्या काव्यमय गुदगुल्या होत होत्या ! भग्नहृदय दुःखाचा तो कादंबरीमय अनुभवही तिला कसला तरी विचित्र आनंद देत होता ! अहाहा ! किती अवर्णनीय सुख होतें त्या हृदयाच्या मोडतोडींत !

तो वेदनेचा आनंद हेमांगिनीला कांहीं काळ पुरला. ह्या अवकाशांत हृदयावर वारंवार हात ठेवून उसासे सोडण्याची तिला सवय लागली होती. एक दिवस हृदयावर तळवा देऊन उसासा सोडण्याच्या ती अगदीं बेतात असतां तिला असें आढळून आलें कीं आपल्या भग्न हृदयाचे सारे छिन्नविछिन्न तुकडे पुन्हा अगदीं सलगपणें जुळून आले आहेत ! झालें, आयुष्य तिला नीरस वाटूं लागलें ! त्यांत प्रेमभंगाचा रोमांच सुद्धा आतां उरला नाहीं ! गंपू राजे सारखा तिच्यामागें लागला होता. त्याची प्रकृतीही बरी होती आणि त्याचा अभ्यासही बरा होता. गंपूच्या अर्जावर रावसाहेब चित्र्यांचीही शिफारस होती ; कारण मुलाच्या कुटुंबीयांशीं त्यांचे बरे संबंध होते. त्याची सांपत्तिक स्थितिही बरी होती आणि वर मुलगाही चांगला होता म्हणून ते गंपूच्या अर्जाला 'बरं' म्हणाले !

पण येथेंच सारा मामला बिघडला. असा सर्व दृष्टींनीं बराच बरा असणारा नवरा हेमांगिनीला नको होता. तिच्या वडिलांनीं गंपूला विनायास दिलेली संमति तिच्या अगदीं मस्तकांत बसली. आणखी वर हा पोरगा तिच्या जातीचा

होता ! हेमांगिनीला वाटलें कीं ज्यांत खटका नाहीं, झगडा नाहीं, रडारड नाहीं, शहारे नाहींत, बंडखोरी नाहीं, त्या लग्नाला कुठें लग्न म्हणतात का ? अशी मुलखावेगळी गोष्ट कधीं तरी झाली होती का ? पळापळ, भांडाभांड, किंवा बोंबाबोंब ह्यांचा जेथें थोडाही संभव नाहीं, अशा जातवाल्याशीं जमलेल्या लग्नाला कोणती रोमांचवादी मुलगी कबूल होईल ? आणि तेही ह्या लग्नाला बापाची संमति असतांना ?. . .बस्स ! एवढ्याच कारणासाठीं तिनें गंपू राजेला सपशेल नकार दिला. [गंपूनें शांतपणें दुसऱ्या पोरीशीं लग्न लावलें !]

हेमांगिनीचे कांहीं आठवडे बरेच कंटाळवाणे गेले. ‘ पिता ’ ह्या संस्थेविषयीं तिच्या आवडत्या लेखकांनीं तिला बरेंच चिथावून दिलें होतें. ‘ पिता ’ म्हणजे शत्रुपक्ष, ‘ पिता ’ म्हणजे ज्याच्याविरुद्ध बंड करावयाचें तो, ‘ पिता ’ म्हणजे मुलीचा ‘ रिंगमास्टर, ’ ही त्यांची क्रांतिकारक शिकवणूक होती. त्यांत गंपू राजेच्या प्रणयाराधनेला रावसाहेब चित्र्यांनीं दिलेल्या संमतीची भर पडली. बिथरून गेलेल्या हेमांगिनीच्या नैतिक संतापाला सीमा उरली नाहीं. चिरूट चघळत आरामखुर्चीवर फुरसतीनें लोळत पडलेल्या रावसाहेबांना ‘ धक्का ’ द्यायला ती अगदीं उतावीळ झाली होती. पण दुर्दैव तिचें ! साऱ्या पाट्या पार करून बापाचा खुंट गदगदा हालवील, असा एकही गडी अद्याप तिला मिळेना. तो कोकणांतला वासू परांजपे तसा निघाला ! गंपू राजाचें नांवच घ्यायला नको !

नंतर [ म्हणजे पहिल्या मोसमाच्या अखेरीस व दुसऱ्या मोसमाच्या सुरुवातीला ] तिला तो पाजी मनुष्य कॅप्टन चव्हाण भेटला ! तो दारुड्या होता, रंगेल होता, गमत्या होता, विजातीय होता, सरकारस्वारीचा गणवेषांतील शिपाई होता आणि सर्वांवर ताण म्हणजे त्याचें बाळपणींच गंगू मोहिते नांवाच्या मुलीशीं लग्न झालें होतें !

संपलें ! चव्हाणच्या व्यसनी रंगेलपणामुळें हेमांगिनीचें हृदय अनुकंपेपासून प्रेमापर्यंत एका दमांत प्रवास करीत गेलें ! त्याचा हातावर शीर घेऊन जगभर हिंडणारा शिपाईबाणा, त्याचे लालभडक डोळे आणि पहिल्या बायकोमुळें त्याच्या आयुष्याची झालेली कुचंबणा, ह्या साऱ्याच गोष्टी हेमांगिनीला

रोमांचकारी वाटल्या आणि फळीवरून सूर मारणाऱ्या तिरय्याप्रमाणें ती एकदम त्याच्या प्रेमांत पडली !

पण कॅप्टन चव्हाणनें एक दिवस तिला आपल्याला वायव्य–ईशान्य आघाडीवर जावयाचा हुकूम आल्याविषयींची वार्ता सांगितली. त्याचप्रमाणें गंगू चव्हाणचा बाप हैबती मोहिते हा अतिशय खुनी व खुनशी मनुष्य असल्यामुळें आपण त्याला बरेच वचकतों व म्हणून दुसऱ्या लग्नाची आवश्यकता पटूनही ती गोष्ट आपणांस शक्य नाहीं असेंही तो प्रांजलपणें म्हणाला. अखेर हेमांगिनीच्या सहवासांत घालविलेल्या आनंददायक काळाविषयीं तिचे आभार मानून व तिच्यापासून कर्जाऊ घेतलेले दोनशें तेरा रुपये, बारा आणे [फक्त] पगारावर परत करण्याचें आश्वासन देऊन कॅप्टन चव्हाण हेमांगिनीच्या आयुष्यांतून रुमाल हालवीत निघून गेला !

पुन्हा सुस्कारे, सुनीतें, वेणीफणीची आबाळ, पांढरीं पातळें, हृदयभंगाचा रोमांचकारी अनुभव व मग हृदयाची डागडुजी, रंगसफेती आणि कंटाळवाणा मध्यंतर, मग परत नवा सोबती, वंचना, सुस्कारे, सुनीतें... अशा क्रमानें हेमांगिनीच्या आयुष्यानें आणखी कांहीं वेढे घेतले.

ह्या काळांत तिचा एक प्रियकर रावसाहेब चित्र्यांच्या खुर्चीखालीं सुरुंग भरायच्या ऐन संधानांत वाख्यानें मेला ! दुसरा एक असाच आणीबाणीच्या वेळीं खडी फोडायला तुरुंगांत पळाला ! रावसाहेब चित्रे अजून आपल्या खुर्चीवर चिरूट चघळत तसेच शाबूत होते. पंचांगाचीं पानें उडत होतीं....
...आणि मग कॉलेजच्या चौथ्या वर्षांत हेमांगिनीला राघवेंद्र रानडे भेटला. राघवेंद्राचें खरें नांव राघ्या रांगडे. त्याच्या उपस्थिति-पुस्तकांतील नांवावरून जरी न्यायमूर्ति रानड्यांच्या वंशवृक्षाचा बोध होत असला तरी राघवेंद्र हा अस्पृश्य समाजाचा एक सन्मान्य घटक होता. परीक्षेच्या यशस्वी उत्तरपत्रिका लिहिण्यांत जर लेखणीऐवजीं क्रिकेट बॅट्चा व मेंदूऐवजीं वळलेल्या मुठीचा अधिक संबंध असता तर राघवेंद्रानें विश्वविद्यालयाचे सारे बौद्धिक विक्रम अक्षरशः मोडून टाकले असते. पण परीक्षेच्या आजच्या पद्धतीपुढें त्याचा नाइलाज होता. भाषेनें शुद्ध शब्दोच्चाराविषयीं भलते हट्ट धरावे, हें सुद्धा त्याला पसंत नव्हतें. कॉलेजच्या परीक्षांतून तो खेळाडूपणाच्या कीर्तीवर

एखाद्या चेंडूसारखा पुढें ढकलला गेला. क्रिकेट पिचवर टाकलेल्या चेंडूमुळें त्यानें परीक्षेचा त्रिफळा उडविला आणि एका अटीतटीच्या सामन्यांत काढलेल्या चमकदार शतकामुळें प्रेमाच्या विषयांत त्याचीं शंभर वर्षें भरलीं. हेमांगिनीनें अभिनंदनपर हस्तांदोलनासाठीं त्याचा हात प्रथम धरल्यापासून पाणिग्रहणाच्या कल्पनेपर्यंत येऊन ठेपावयास तिला पुरते पंधरा दिवस सुद्धा लागले नाहींत. राघवेंद्राचे डोळे वाजवीपेक्षां जरा जास्त बटबटीत होते, त्याचें शरीर घाटदार व पिळदार असलें तरी त्याचा वर्ण तेलिया होता, त्याचे उच्चार असावयास पाहिजेत तितके अचूक नव्हते, ह्या साऱ्या गोष्टी खऱ्या पण कादंबऱ्यांतील नायिका कादंबऱ्यांतील नायकाच्या रूपाशीं, गुणाशीं किंवा जातीशीं लग्न लावीत नाहींत, तर त्या **त्याच्याशीं** लग्न लावतात, हें हेमांगिनीला माहीत होतें. एका पददलित जातींतील अस्पृश्य तरुणाशीं लग्न लावण्याच्या कल्पनेनें तिचा कनवाळू आत्मा शहारून गेला! आपल्या अस्फुट 'प्रीतीची' वार्ता रावसाहेबांना कळतांच त्यांना व समाजाला बसणाऱ्या धक्क्याच्या कल्पनेनें ती बेहोष झाली!

राघवेंद्र मात्र चांगला शुद्धीवर होता. अस्पृश्यतेचे एकूण राजकीय लाभ लक्षांत घेतां, त्यांच्या सवंग उद्धाराची घाई करणाऱ्या महाभागांविषयीं त्याला अतिशय चीड होती. परीक्षकानें टाकलेल्या वाकड्या तिकड्या प्रश्नामुळें तो कदाचित् चकला असता, पण भाजीबाजारांतील वांगीवालीची मात्र त्याला चकाविण्याची प्राज्ञा नव्हती. गरिबी, गरिबांच्या शिष्यवृत्त्या व फाटके कपडे ह्या त्रासदायक गोष्टी आहेत हें त्याला माहीत होतें. रावसाहेब चित्रे किंवा समाज ह्यांना धक्के देण्यासाठीं तो प्रेमाच्या फंदांत पडला नव्हता. त्या साऱ्यांना सुखेनैव तसेंच झोपूं देण्यास त्याची मनाई नव्हती. हेमांगिनीकडून स्वतःचा उद्धार करून घेण्यासाठीं तो तिच्या नादीं लागला नव्हता. त्याची खरी इच्छा आपल्या जातीच्या एखाद्या पोरीचें आयुष्य उजळून काढण्याची होती. पण हेमांगिनी ही सुखवस्तु बापाची एकुलती एक वारस होती. राघवेंद्र भला माणूस होता, पण पैशाचें मोल त्याला माहीत होतें आणि म्हणूनच अगदीं उघड्या डोळ्यांनीं सूर्यचंद्राशीं लगट करावयास तो हेमांगिनीसहवर्तमान आज कॉलेजच्या कुंजांत ठाण मांडून बसला होता!

सायंकाळची वेळ होती [ अर्थात्‌च ! ]. हेमांगिनीपासून सुटी मागून सूर्य नुकताच अस्ताचलास गेला होता. तिच्या विनंतीस मान देण्यासाठीं चंद्र व तारका हळुहळू आकाशांत हजर होत होत्या. आकाश नेहमींच्याच जागीं होतें. सर्वत्र शांतता होती. लताकुंजाच्या फटींतून पंधरा वर्षांचीं दोन पानचट पोरें आंत डोकावून पाहात आहेत ह्याचें एकमेकाला खेटून बसलेल्या त्या प्रणयी युगुलास भान नसावें. हेमांगिनी राघवेंद्राच्या कोटाशीं वारंवार चाळा करीत होती, तें त्याला आवडत नव्हतें. कोटाखालीं झाकलेला त्याचा सद्रा छातीवर फाटलेला आहे, ह्याची त्या निरागस बालिकेस कल्पनाही नव्हती.

आपल्या प्रियकराच्या चेहेऱ्यावर उमटणारे वेदनेचे भाव पाहून त्याला अधिकच बिलगत [ व त्याच्या डगल्याच्या कॉलरला लोंबकळत ] हेमांगिनी भावनोत्कट स्वरांत म्हणाली,

“ नाहीं रे ! मी तुला कधींही सोडणार नाहीं ! माझं हृदय मी तुला कसं बरं उघडं करून दाखवूं ? तुझा दुःखी चेहेरा माझ्यानें बघवत नाहीं रेऽ ! ”

राघवेंद्राचा चेहेरा अगदीं कासावीस झाला होता हें खरें. नानू बेंद्रेकडून उसना आणलेला फॅशनेबल बूट त्याला बराच चावत होता. त्यामुळें कोणताही प्रयास न करतां अगदीं कळवळून तो म्हणाला,

“ तसं नाहीं ग ! तुझी मला मुळींच भीति वाटत नाहीं. पण तुझ्या बापाची मला फार भीति वाटते ग ! ”

“ माझ्या बाबांना भिण्याचं मुळींच कारण नाहीं. आपण पक्के असलों म्हणजे झालं ! ”

“ तसा मी कुणाच्या बापाला भिणार नाहीं. पण सारं गोडीगुलाबीनें झालं तर बरं ! ”

“ बाबांनीं नाहींच ऐकलं तर माझ्या राघूसाठीं मी साऱ्या घरादारावर लाथ मारून तुझ्यामागें येईन ! ”

घरादारावर लाथ मारण्याची ही कल्पना ऐकून बेचैन झालेला राघवेंद्र कंपित स्वरांत म्हणाला, “ एकदम एवढ्या निकरावर येऊन कसं बरं चालेल ?

माझ्यासाठीं तुझ्या बापाच्या घराला तूं पारखं व्हावंस, अशी माझी योग्यता नाहीं! मी गरीब, कुरूप, जातीचा अस्पृश्य!"

"नको रे," राघवेंद्राच्या तोंडावर हात देऊन त्याच्या बटबटीत डोळ्यांत कारुण्यपूर्ण नजरेनें पाहात हेमांगिनी म्हणाली, "नको रे! असं बोलूं नकोस! तुझ्या जातीवर, पैशांवर किंवा रूपावर का मी प्रेम करतें? मी तुझ्यावर प्रेम करतें! जगाची, बाबांची किंवा त्यांच्या पैशांची मला पर्वा नाहीं!"

आपल्या प्रियकरणीची पैशाविषयींची ही बेफिकीर वृत्ति पाहून राघवेंद्राच्या आंगाचा थरकांप उडाला. मलूलपणें तो म्हणाला,

"मृत्युपत्र न केल्यामुळें एखाद्या नजीकच्या सपिंडानें तुझ्या वडिलांची इस्टेट मारली, तर त्याचं मला एवढं वाटणार नाहीं! पण माझ्यासाठीं तुला एवढा त्याग करूं देणं, हा माझ्या प्रेमाला केवढा बरं काळिमा आहे?"

राघवेंद्राचें हें उमदें भाषण ऐकून हेमांगिनीला अगदीं खदखदून रडूं आलें व त्याच्या छातीवर मस्तक ठेवून ती अश्रु ढाळूं लागली. राघवेंद्रही अतिशय अस्वस्थ झाला, कारण रडून रडून आपल्या आंगांतला कोट हेमांगिनीनें भिजवला तर उद्यां कॉलेजांत जातांना घालायचें काय, हा प्रश्न त्याच्यापुढें 'आ' वासून उभा होता. रडें आवरण्याविषयीं आर्जवून त्यानें हेमांगिनीचें मस्तक वर उचललें, तेव्हां त्याचें कारण काव्यमय नसून व्यवहारी होतें.

"मला आतां तुझा विरह सहन होत नाहीं रे!" हेमांगिनी रडें आवरीत म्हणाली.

"मला सुद्धा" राघवेंद्र चावणाऱ्या जोड्यांतील पाय चाळवीत म्हणाला, "ह्या भयंकर दिवसांचा कंटाळा आला आहे."

"मग मी लवकरच बाबांना विचारून सोक्षमोक्ष लावतें."

"विचार, पण नीट जपून! तुला कोणतंही दुःख झालेलं मला सहन होणार नाहीं."

"मला बाबांनीं एका लुगड्यानिशीं घराबाहेर काढली, तर मी धावत तुझ्याकडे येईन! तूं नाहीं ना रे मला अंतराय देणार? देशील ना तूं

आसरा मला तुझ्या प्रेमाचा ?" हे शब्द ऐकतांच "चोखामेळा सन्मित्र निवासा" ची चंद्रमौळी खोली राघवेंद्राच्या डोळ्यांसमोर फिरली व त्याला अंधेरी आली.

"... माझ्या गळ्यावर हात ठेव आणि ह्या साऱ्या तारकांना व त्या रजनीनाथाला साक्ष ठेवून माझी शपथ घे." असें पुढें हेमांगिनी म्हणाली व तिनें राघवेंद्राचा हात आपल्या गळ्यावर ठेवला.

राघवेंद्राच्या डोळ्यांसमोर केवळ तारेच नव्हेत तर काजवेही चमकले. त्याची प्रकृति उत्तम होती व त्याला अतिशय भूक लागली होती. शपथ घेण्यासाठीं हेमांगिनीच्या गळ्यावर ठेवलेला हात दाबून आवळण्याचा मोह त्यानें कष्टानें आवरला व काय वाटेल तें झालें, तरी तिला अंतर न देण्याची शपथ त्यानें घेतली, तेव्हां त्याचें हृदय छातींतून पोटांत उतरलें होतें व हेमांगिनीचें मस्तक पुनरपि त्याच्या छातीवर विसावत होतें. अश्रूंचा नवा पाऊस पाडण्याच्या व आणखीही कांहीं करण्याच्या ती अगदीं बेतांत होती. तेवढ्यांत बाहेरून शिट्या व टाळ्यांचा आवाज सुरू झाला. कुंजांतील एकूण दृश्य कमालीचें विनोदी वाटल्यामुळें फटींतून चौकस चिकाटीनें आतांपर्यंत डोकावत बसलेलीं तीं दोन पोरें खो खो करून अगदीं नाचूं लागलीं होतीं!

  

कॅलेंडराचीं आणखी कांहीं पानें उडाल्यावर एक दिवस हेमांगिनी आपल्या बापासमोर निश्चयाचा कठोर चेहेरा घेऊन उभी होती.

"बाबा ..." ती म्हणाली.

"काय बाळ ?" चिरूट रवंथ करीत व पुस्तकावरील डोकें न उचलतां बाबा म्हणाले.

"तुम्हांला एक प्रश्न विचारूं ?"

"विचार बेटा!"

"तुम्हीं रागावणार तर नाहीं ?"

"आणि समज रागावलों तर ?"

" तर मी तुमच्या रागाची पर्वा करणार नाहीं. मला आतां कशाचीच पर्वा राहिली नाहीं." हेमांगिनीच्या तोंडाभोवतीं प्रकाशाचें वलय उमटूं लागलें होतें. पिता ह्या संस्थेविरुद्ध जेहाद पुकारण्याची संधि आज फार वर्षांनंतर तिला प्रथमच मिळाली होती. ती आतां कोणालाच डरणार नव्हती. तिच्या आवाजांतील बेगुमान सूर ऐकतांच रावसाहेब चित्रे खुर्चीतल्या खुर्चीत ताठ बसले. हा सूर त्यांना अपरिचित होता. आश्चर्यानें ते म्हणाले, " पोरी, काय बोलतेस तूं ?"

" मी खरें तेंच बोलतें !"

" अग पण म्हणजे काय ?"

" मी लग्न करणार आहें !"

हें उत्तर ऐकून रावसाहेबांनीं आरामखुर्चीच्या हातावर स्वतःचे हात मारले व ते हसत सुटले.

" अग मग करीनास ? पोरींच्या जातीनें लग्नच करायला पाहिजे ! नवरा पाहून देऊं का तुला ?"

" मीं पाह्यला आहे !"

पोरीचे शब्द ऐकतांच रावसाहेब चित्रे दोन हात वर उडाले व त्यांनीं विचारलें, " कोण पाह्यला आहेस तूं ?"

गेल्या चार वर्षांत आपण कादंबऱ्या वाचीत असतां आपल्या लेकीनें एवढी प्रगति केली असेल अशी त्यांना कल्पना नव्हती. त्यांना कल्पनाशक्तिच मुळीं कमी होती.

" राघवेंद्र रानडे !" दोनच शब्दांत हेमांगिनीनें उत्तर दिलें.

" तुझ्याकडे येणारा तो बटबटीत डोळ्यांचा... ?" दम छाटीत रावसाहेब म्हणाले.

" होय !" हेमांगिनीनें उत्तर दिलें.

" तो तेलिया रंगाचा...?"

" होय !"

" रेड्यासारखा माजलेला ? "

" बाबा, तुम्हीं आपल्या भावी जावयाविषयीं असं न बोलाल तर बरं ! "

असलीं उत्तरें ऐकायची रावसाहेबांना सवय नव्हती. इच्छा असूनही असलीं उत्तरें देण्याचा प्रसंगच कधीं हेमांगिनीवर आला नव्हता. हेमांगिनीची आज्ञार्थी भाषा ऐकून खवळलेले रावसाहेब ओरडले,

" राघवेंद्र रानडे ! तो ब्राह्मणाचा पोर ! त्यापेक्षां एखाद्या महाराशीं कां लग्न लावीत नाहींस तूं ! "

" महारच आहेत ते ! "

" काय म्हणालीस ? " ओठांतला चिरूट गप्पकन् अर्धा गिळीत रावसाहेब किंचाळले, " राघवेंद्र रानडे महार आहे ? "

" होय ! "

" त्याच्याशीं तूं लग्न लावणार ? "

" होय ! "

" कार्टे ! फोडून काढीन उभी. माहीत नाहीं तुला ! "

" बाबा, ह्या गोष्टी कुणाला सांगतां ? माझं व्यक्तित्व मारणारे तुम्ही कोण ? " हेंच, हेंच बंडखोर वाक्य उच्चारण्यासाठीं हेमांगिनीनें आजपर्यंत तपश्चर्या केली होती.

" मी कोण ? तुझा बाप ! व्यक्तित्त्व नाहीं, तुला मारणार आहें मी ! " असें म्हणून कोपऱ्यांतली काठी घेण्यासाठीं रावसाहेब उठण्याची धडपड करूं लागले, पण तेवढ्यांत संधिवातानें पछाडलेल्या त्यांच्या गुडघ्यांत विलक्षण कळ उठली व ते परत खुर्चीत कोसळले. सर्व घटना अगदीं कादंबरीमय होत असलेल्या पाहून हेमांगिनीला धन्य वाटलें व पांच फूट दोन इंच उंचीचा आपला देह पुरता उभारून ती म्हणाली, " बाबा, तुमची नि तुमच्या पिढीची मला कींव येते ! "

" चांडाळणी ! चालती हो माझ्या घरांतून ! एक क्षणभर माझ्या डोळ्यांसमोर उभी राहूं नकोस ! काळं फासलंस माझ्या तोंडाला तूं . . . ! "

" तुमची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. बाबा, तुमच्या पैशांचा मला किंवा माझ्या राघूला कधींच लोभ नव्हता ! ही मी चाललें !"

हेमांगिनी आपल्या पित्याकडे पाठ फिरवून चालूं लागण्याच्या बेतांत असतांच तिचें कार्य सुलभ करण्यासाठीं रावसाहेबांनीं लाथ उचलली. एका अर्वाच्य शिवीचें आद्यक्षरही त्यांच्या तोंडांतून उमटलें. नंतर निश्चित काय झालें तें सांगणें कठीण आहे. रावसाहेबांच्या ओठांतला सहा इंची चिरूट त्यांच्या तोंडांत कोठल्या कोठें गडप झाला. त्यांनीं छातीवर दोन्हीं हात दाबून एक किंकाळी मारली व एका लोकप्रिय शिवीचें अंतिमाक्षर उच्चारण्याचा कमाल प्रयत्न करीत असतांच डोळे फिरवून त्यांनीं ह्या नश्वर जगाचा निरोप घेतला !

  

हेमांगिनीचें दुःख आम्हीं काय वर्णावें ? रावसाहेब चित्र्यांच्या मृत्यूनंतर तिच्या आयुष्यांत कसलाच राम उरला नाहीं ! आतां कोणाच्या जुलमी अधिकाराविरुद्ध तिनें बंड पुकारावें ? कोणाला बाणेदार भाषणें ऐकवावींत ? कोणाच्या घरावर लाथ मारावी ? कारण तें घर आतां तिच्याच मालकीचें झालें होतें. उभ्या जगांत तिला एका कपड्यानिशीं घराबाहेर काढूं शकणारा कोणी मनुष्य आतां हयात नव्हता. बापानें अगदीं मरतां मरतां तिचा दावा साधला. एखाद्या फुटलेल्या फुग्यासारखें तिला आतां वाटूं लागलें. इकडे समाजही तिचा छळ करीना ! समाजाला दुसरीं कामें होतीं. तिनें अगदीं अस्पृश्याच्या मुलावर प्रेम करून पाहिलें. पण कोणी एक मायेचा पूत तिच्याविषयीं 'ब्र' बोलायला रिकामा असेल तर शपथ ! तिला बापाची मोठी आशा होती पण त्यानें तो तसा प्रकार केला ! हेमांगिनीचें सारें आयुष्य एकदम सपाट झालें. हेमांगिनीनें संकटाविरुद्ध झगडा करण्याची मोठी जय्यत तयारी करून ठेवली होती. पण संकटें तिच्या वाऱ्याला ठरत नव्हतीं ! आयुष्याच्या प्रेमांत आणि प्रेमाच्या आयुष्यांत कोठें एक रोमांचकारी अडचण दिसत असेल तर हराम ! बराच वेळ ताणून एकदम सोडलेल्या स्प्रिंगसारखें तिचें जीवन मोकळें मोकळें झालें होतें. पूर्वीं एका क्षणांत चोवीस वेळां ती राघवेंद्राची आठवण करीत असे आणि आतां गेल्या चोवीस दिवसांत एक क्षणभरही तिनें त्याच्याविषयीं विचार केला नव्हता !

राघवेंद्र! राघवेंद्र! खरेंच मोठा चलाख छोकरा होता तो! मोठा धूर्त! रावसाहेब चित्रे अगदीं अकस्मात् परलोकवासी झाले, हें त्याला अर्थातच माहीत होतें. म्हणूनच गेल चोवीस दिवस तो हेमांगिनीकडे फिरकला सुद्धा नव्हता. समजा, कांहीं भलतं त्रांगडं असलं आणि तें आपल्या गळ्यांत पडलं तर? आपण गरीब माणसं! असा पोक्त विचार करून तो 'चोखामेळा सन्मित्र निवासांत' स्वस्थ होता. हेमांगिनीशीं लग्न लावणें सोपें होतें पण हेमांगिनीच्या ऐहिक सर्वस्वासकट तिचें पाणिग्रहण करण्यांत संकटांचे पहाड उभे आहेत, हं कळण्याइतका तो समजदार होता. रावसाहेब चित्र्यांच्या अपघाती मृत्यूच्या कल्पनेशीं केवळ स्वप्नरंजन म्हणून तो पुष्कळदा खेळत असे! पण आपल्या स्वप्नाला सत्त्याचा आधार इतक्या लवकर मिळून सारें कांहीं सोन्यापेक्षां पिवळें पडेल, असें त्याच्या कधीं स्वप्नांतही आलें नव्हतें!

रावसाहेब स्वर्गवासी झाल्याची वार्ता राघवेंद्राला कळली आणि त्याला स्वर्ग केवळ दोन बोटें राहिला. तो हाडाचा सावध म्हणून मोजून चोवीस दिवस त्यानें कशीबशी कळ काढली. हे चोवीस दिवस त्यानें कादंबऱ्यांतील उत्तम वाक्यें पाठ करण्यांत, शुद्धलेखनाचे नियम वाचण्यांत आणि कर्ज काढून कपडे शिवण्यांत मोठ्या कष्टानें व्यतीत केले. हेमांगिनीविषयीं आतां मात्र त्याला अनावर प्रेम वाटूं लागलें. तें इतकें कीं सर्वत्र सामसूम आहे असें पाहातांच रावसाहेबांच्या मृत्यूपासून बरोबर पंचविसाव्या दिवशीं उत्तम व बिनफाटक्या कपड्यांत सजून तो हेमांगिनीसमोर हजर झाला.

"हेमांगिनी," तो छातीवर तळवा देऊन म्हणाला, "मी आलों!"

"बरं!" ती निर्विकार मुद्रेनें म्हणाली.

"माझ्या जिवा, धावतच मी तुझ्याकडे येत आहें!"

"शंभर यार्ड धावायला तुला किती वेळ लागतो? गेले चोवीस दिवस तूं सारखा धावतच आहेस काय?" तिनें विचारलें.

ह्या प्रश्नाचें उत्तर त्यानें नुकत्याच वाचलेल्या कादंबऱ्यांत नसल्यामुळें तो थोडा गडबडला व म्हणाला,

"ईश्वरी इच्छेपुढं इलाज नाहीं. झालं तें झालं!"

" हं ... ! " ती तुळईकडे पाहात म्हणाली.

" जगरहाटीकडं पाहून आतां तुला समाधान मानलं पाहिजे. रावसाहेब गेले पण मी तर आहें ना ? "

" आहेस ! " ती म्हणाली. तिची ही एकाक्षरी भाषापद्धति त्याला सर्वस्वी अपरिचित होती. ती त्याला एखाद्या बॉडीलाइन चेंडूसारखी वाटली व अधिकच गोंधळून तो म्हणाला,

" माझ्याकडं पाहून तूं आतां समाधान मानण्याचा प्रयत्न कर ! "

" तूं कधीं आरशांत पाह्यलं आहेस काय ? " तिनें विचारलें.

" नाहीं ! " तो म्हणाला, " माझ्यापाशीं चांगलासा आरसाच नाहीं. नानू बेंद्रे आजकाल आपल्या वस्तु मला वापरूं देत नाहीं. गरिबी मोठी कठीन आहे ! " असें म्हणून त्यानें खोल उसासा सोडला.

" तर मग त्या समोरच्या आरशांत पाहा. नि तिथं तुला जें कांहीं दिसेल त्यामुळं तुझं तरी समाधान होतं काय तें मला सांग ! "

" प्रेम हें आंधळं असतं. मला तूर्त कांहींच दिसत नाहीं ! तूं माझ्या रूपावर, जातीवर किंवा विद्येवर प्रेम करीत नसून माझ्यावर प्रेम करतेस हें मला ठाऊक आहे. आपले संकटाचे दिवस आतां संपले ... " तो आठवून आठवून बोलूं लागला.

" हं ... " ती म्हणाली.

" काळोखी रात्र समाप्त झाली ... "

" हूं ! " ती म्हणाली.

" सारं आकाश निरभ्र झालं ! "

ती कांहींच बोलली नाहीं.

" संकटं औषधालाही उरलीं नाहींत ! म्हणून माझ्या प्राणा ... "

तो मध्येंच थांबला, कारण तिचा चेहेरा थिजून अगदीं संगमरवरी बनला होता. तरीही दम बांधून तो म्हणाला,

" म्हणून माझ्या प्राणा, आतां अधिक कालावधि न लावतां आपण विवाहबद्ध होऊं या ! "

" तें शक्य नाहीं ! " हेमांगिनी दगडी जिभेनें बोलली.

" कां बरं ? " राघवेंद्र घाबरा होऊन म्हणाला, " कां बरं ? सारीं संकटं तर आतां नष्ट झालीं आहेत. "

" म्हणूनच ! " ती म्हणाली.

" म्हणजे ? " राघवेंद्र विजेचा लोळ पाहाणाऱ्या माणसाच्या स्वरांत म्हणाला, " तुझं माझ्यावर प्रेम होतं कीं संकटांवर ...? "

हेमांगिनीनें उत्तर केलें नाहीं. तिनें फक्त कपाळाला शेंकडों आठ्या घातल्या. राघवेंद्र काय समजावयाचें तें समजला व कपाळावर हात मारून तो आर्जवी स्वरांत म्हणाला,

" हेमांगिनीदेवी ! " ... बहुवचन !

" काय म्हणतां ? "

" कसं सांगूं ? " राघवेंद्र आवंढे गिळीत म्हणाला.

" शुद्ध मराठींत सांगा ... " हेमांगिनीदेवींनीं आज्ञा केली.

" शहात्तर रुपये चार आणे ! " कपाळावरील घाम पुशीत राघवेंद्रानें उत्तर दिलें ! हेमांगिनीनें भुंवया उचलून नुसताच प्रश्नार्थक चेहेरा केला.

" शहात्तर रुपये चार आने ... " काकुळतीनें राघवेंद्र पुन्हा म्हणाला, " तुमच्यापायीं मला झालेलं नानू बेंद्रेचं कर्ज ! पाठीवर मारा, पन ... ! "

तुच्छतेनें नाक उडवीत देवी हेमांगिनी ड्रेसिंग टेबलपाशीं गेल्या आणि सुवाच्य अक्षरांत त्यांनीं बँक ऑफ इन्डियाचा ७६ रु. ४ आण्यांचा बेअरर चेक लिहून तो राघवेंद्राच्या दिशेनें भिरकावला !

# निष्ठा

नर्स नाडकर्णीच्या लग्नावरून सर्वसामान्य लग्नाविषयीं आणि वैवाहिक निष्ठेविषयीं गोष्टी निघाल्या. आम्ही तिघेही एकेका जमान्यांत नाडकर्णीशीं सर्व तऱ्हेचे खेळ खेळून दमलों होतों. इस्पितळांत अशा पुष्कळ बाया येतात आणि जातात. वाटेल तितका वेळ मौज केली आणि कंटाळा आला तेव्हां रामराम ठोकला. ती सुद्धा कांहीं सीता सावित्री लागून गेली नव्हती. तितक्याच सहजपणानें तिनेंही आम्हांला निरोप दिला. हृदयभंग नाहीं, उसासे नाहींत किंवा परस्पराविषयीं कसला कडूपणा सुद्धा नाहीं. अद्यापही तिची आणि आमची रात्रपाळी आली आणि कॉरिडॉरच्या एखाद्या कोपऱ्यांत पुरेसा अंधार असला, तर आमच्या जुन्या प्रेमाची नवी पावती आम्हीं देतों आणि एप्रन् झटकून पुढें होतों. छट्! आम्हां तिघांपैकीं कोणालाच दुसऱ्याविषयीं कधीं मत्सर वाटला नाहीं. आमची मैत्री खरी होती आणि नर्स नाडकर्णी खोटी होती.

आज नर्स नाडकर्णीनें लग्न केलें, तेव्हां आम्हांला फार आश्चर्य वाटलें. लग्नाशिवाय इतर कोणतीही गोष्ट तिनें केली असती तर आम्हांला त्यांत मुळींच नवल वाटलें नसतें. दिवसांतून तीन वेगळ्या पठ्ठयांशीं तिनें प्रणयचेष्टा केल्याचें आम्हांला कधींही आश्चर्य वाटलें नव्हतें. वॉर्डमधला एखादा रोगी, वैद्यकीय विद्यालयांतला एखादा कोवळा पोर किंवा एखादा मुरलेला आर्. एम्. ओ. अशा तिघांनाही लागोपाठ खो देत झुलवत ठेवणें तिच्या डाव्या हाताचा मळ होता. पण लग्न ? आणि तेंही डॉ. कदमसारख्या शांत, थंड आणि सज्जन माणसाशीं ? तिच्यांत आणि त्याच्यांत कांहींच साम्य नव्हतं. तिनें आजपर्यंत काय काय केलें होतें आणि किती भानगडी उजवल्या होत्या ह्याची मोजदाद तिची तिला तरी होती कीं नाहीं कोणास ठाऊक. पण डॉ. कदम मात्र त्याच्या नेत्रशास्त्रांत तपस्वी आणि कलावंत म्हणून ठाऊक होता. त्याचा पण मार्ग सरळ होता. त्याचें आयुष्य व्यासंग आणि सेवेच्या मार्गानें आजपर्यंत तरी अगदीं नाकासमोर गेलेलें होतें आणि आज तो आमच्या नाचऱ्या नाडकर्णीशीं लग्न लावून बसला !

इस्पितळाला जोडून असलेल्या आर्. एम्. ओ. क्वार्टर्समध्यें आम्हीं ह्या लग्नाच्या भवितव्याविषयीं चर्चा करीत बसलों होतों. महाडिक, मी किंवा

चौबळ ह्यांपैकीं कोणाचाच नीतिशास्त्र हा विषय नव्हता. धनुर्वातानें पछाडलेल्या रोग्यांची खास तजवीज रेसिडेंट् मेडिकल् ऑफिसर् महाडिक तूर्तास पाहात होता. डोळ्यांच्या किचकट भानगडी मी निस्तरत होतों आणि आमचा एकेकाळचा वर्गबंधु चौबळ शेवटच्या वर्षांत कधीं मेडिसिन्, तर कधीं पॅथॉलॉजी ह्या क्रमानें अजूनही गोते खात होता. त्याचें एक वर्तुळ ( cycle ) नुकतेंच पूर्ण झालें होतें आणि परीक्षकांना अधिक किती चक्राकार प्रदक्षिणा त्याच्या हातून घडणार होत्या, तें सांगणें कठिण होतें. इस्पितळासमोर असणाऱ्या "**ला रोमान्स**" नांवाच्या इमल्यांत चौबळचें वास्तव्य होतें आणि कोणतीही विशेष गोष्ट झाली कीं तिचा आमच्याबरोबर खल करण्यासाठीं क्वार्टर्समध्यें धावत येण्याचा त्याचा शिरस्ता होता.

आज नर्स नाडकर्णीचें डॉ. कदमशीं लग्न झालें आणि त्या किंवा इतर कोणत्याही विवाहाशीं संबद्ध असणाऱ्या अनेक सुवाच्य आणि अवाच्य गोष्टींची खबर घेऊन अखेर आम्ही "निष्ठा" ह्या विषयावर येऊन ठेपलों. माझ्या खोलींत आतां आम्हीं तिघेच उरलों नव्हतों. तेथें आतां आणखी कांहीं वक्ते आणि श्रोते जमा झाले होते.

**नाडकर्णी–कदम** लग्नाच्या बनावाविषयीं व परिणामाविषयीं प्रत्येकाचें स्वतंत्र मत होतें. कोणी आठ दिवसांत ह्या लग्नाचे बारा वाजतील अशी भविष्यवाणी बोलला, कोणीं नेत्रविशारद डॉ. कदमच्या आंधळ्या डोळ्यांवर आधींच शस्त्रक्रिया व्हायला पाहिजे होती म्हणून सांगितलें आणि कोणीतरी म्हणाला, कीं डॉ. कदम थंड आणि शांत दिसत असला, तरी तो दुबळा नाहीं. लग्नानंतर तो आपल्या नाचऱ्या बायकोला अवश्य निष्ठा शिकवील. [ तिच्या डोळ्यांत अंजन घालील, असा विनोद येथें आणखी कोणी केला! ] तिचे चाळे विवाहोत्तर त्याला खपणें शक्य नाहीं. कोणाही जातीच्या पुरुषाला खपणें शक्य नाहीं !

ह्या शेवटच्या विधानाला डॉ. संत नांवाच्या नवमतवाद्यानें विरोध केला. हा वैवाहिक नीतीचा किंवा निष्ठेचा प्रश्न नसून वैयक्तिक सोयीचा व Adjustment चा प्रश्न आहे असें त्याचें मत होतें. निष्ठा आणि पातिव्रत्य

ह्या मध्ययुगीन कल्पना आहेत. प्रगत आणि पुरःस्सर मानव त्यांचीं बंधनें मानणार नाहीं व त्यानें तीं मानूं नयेत, इत्यादि मुद्दे तो आवेशानें मांडीत होता. डॉ. कदम हा न्यायी, विचारी आणि शांत माणूस असल्यामुळें तो आपल्या पत्नीच्या स्वतंत्र व्यक्तित्वावर घाला घालणार नाहीं, एवढेंच काय, पण तिच्या जुन्या सोबत्यांचा तो अद्यापही आदरानें सत्कार करील, पातिव्रत्य व निष्ठा ह्यांच्या ढोंगी कल्पना तिच्यावर लादून तिची तो कदापि कुचंबणा करणार नाहीं, उघड्या डोळ्यांनींच त्यानें नर्स नाडकर्णीशीं विवाह केला आहे, वगैरे गोष्टी संत सांगत असतांच डॉ. मेहेरा नांवाचा उंचनिंच व गौरवर्ण तरुण पुढें झाला व त्यानें संतच्या तोंडावर हात ठेवून इमान व निष्ठा ह्या विषयांवर आपल्या दप्तरीं गेल्याच आठवड्यांत दाखल झालेला एक अनुभव निवेदन करण्याची इच्छा दर्शविली. हा पंजाबी डॉक्टर चांगला रंगेल, रसिक व थट्टेखोर होता आणि कोणतीही गोष्ट खुलवून सांगण्याची त्याची शैली मोठी आकर्षक होती. डॉ. संत एखाद्या एनेमा पॉटसारखा असला तर मेहेरा विन्कार्निसच्या एखाद्या पेल्यासारखा होता. संतच्या व्यासपीठात्मक रेचकापेक्षां मेहेराच्या गोड गोष्टीचें सायरप वसाका सगळ्यांनाच जास्त प्रिय होतें. आपल्या ढंगदार हिंदुस्थानी ऐटींत डॉ. मेहेरा बोलूं लागला आणि अनेक आवाजांनीं गजबजलेली ती खोली एकदम शांत झाली. संतनेंही शहाणपणा करून आपल्या तोंडाला बूच बसविलें आणि मग संथपणें खोलींत फेऱ्या घालीत व प्रत्येकाला सामोरे होत मेहेरानें आपला अनुभव सांगण्यास प्रारंभ केला —

  

" जेव्हां मुंबईच्या गोदींत परवां भयंकर स्फोट झाला तो आणि त्यानंतरचे चार दोन दिवस आपणांपैकीं बहुतेकांनाच अतिशय कामाचे आणि श्रमाचे गेले. कॅजुअॅल्टी ऑफिसला क्षणाची उसंत नव्हती आणि वॉर्डोवॉर्डीतून मोडतोड झालेल्या छिन्नविछिन्न शरीरांचा नुसता खच पडला होता. बॉसनें निकडीची नोटिस लावली असतांही पांच दहा मिनिटं थातूरमातूर करून खोलींत येऊन झोपूं शकणारे कांहीं सुखी जीव आपल्यांतही तेव्हां होते, नाहीं असं नाहीं. पण आमच्यासारख्या सर्जिकल् वॉर्डीतल्या कर्तव्यशील

माणसांची हड्डी तेव्हां चांगलीच नरम झाली. त्यांत कौशल्याचं काम फारसं कांहीं नव्हतं. आमच्या जागीं एखादा खाटिक, चांभार किंवा शिंपीही प्रसंगीं चालून जावा, इतक्या ढोबळ प्रतीचं तें बहुतेक काम होतं. पण तेंच काम आम्हांला इतकं पडलं म्हणतां, कीं आमची सुद्धा गणना आमच्या अर्धमेल्या रोग्यांत कुणी करील तर बरं, असं वाटायची पाळी आमच्यावर येऊन ठेपली. त्या प्रळयांत जे मरायचे ते मेले आणि जे जगायचे ते आपल्या वडलांच्या पुण्याईनें वांचले, पण कामाला उतार पडला तेव्हां मला कांहीं माझ्या जिवाची शाश्वती राहिली नव्हती. वेळीं अवेळीं आणि रात्रीं बेरात्रीं नाइट-सुपरतर्फे येणाऱ्या निमंत्रणांना मी अगदीं कंटाळून गेलों होतों. म्हणून मीं ठरवून टाकलं कीं एक सगळी संध्याकाळ आणि एक अख्खी रात्र आतां नुसती चैन करायची – बस्स! दहा मरोत पण दहांचा पोशिंदा न मरो! रोगी मेले तर बेहेत्तर, पण डॉक्टर मरून जगाचं चालणार नाहीं. म्हणून मीं निश्चय केला, कीं माझ्या एका दर्दी मित्राचा सल्ला घेऊन ज्या एका मजेदार ठिकाणीं मी बरेच दिवस जाऊं म्हणत होतों, तिथें आतां जायचं!

"नाहीं संत, माझी मॉड रस्कीना त्या दिवशीं इस्पितळांत किंवा नर्सेस क्वार्टर्समध्यें नव्हती. नाहीं तर ही गोष्ट सांगायचा आज माझ्यावर प्रसंगच आला नसता. इस्पितळांतल्या कामाचा एकंदर रागरंग पाहून तें गिरेबाज कबुतर दुपारींच उडून गेलं होतं. मी ए. एम. ओ. च्या परवानगीनें लोकम् देण्याचा विचार करीत असतांच ती चलाख छोकरी S. H. P. [Sleeping Home Pass] घेऊन रात्रीसाठीं पसार झाली होती.

"ती आपल्या स्थानिक पालकाकडे रात्र घालवायला गेली होती, ह्याचा अर्थच असा होता कीं त्या रात्रीं ती ह्या पंचवीस लाखांच्या मुंबईत कुठेंही असणं शक्य होतं, फक्त ती तिच्या स्थानिक पालकाकडे मात्र नव्हती. कारण त्याचा पत्ता मला माहीत होता आणि कर्तव्य म्हणून त्याच्याकडे मीं टाकलेली फेरी अपेक्षेप्रमाणें वाया गेली.

"तिनें ज्याअर्थी आपला मार्ग शोधला होता, त्याअर्थी मलाही स्वतःच्या दुःखासाठीं औषधपाणी शोधणं अवश्य होतं. मी खरोखरच फार थकलों होतों

आणि त्यांत गेले पंधरा दिवस एखाद्या तपस्व्यासारखा अगदीं कोरडा ठणठणीत राहिलों होतों. वादळानें छेडलेल्या गलबताला साधारण बऱ्यापैकीं असं कुठलंही बंदर चालतं.

" माझ्या माहितगार मित्राला शोधायला म्हणून मी माहीमला गेलों, तेव्हां 'साहेब रात्रीसाठीं बाहेर गेले आहेत' असं त्याच्या नोकरानें मला डोळे मिचकावून सांगितलं. त्याचा आशय मला समजला आणि चडफडत व आंतल्या खिशांतली व्हिस्कीची बाटली चांचपत समोरच थांबलेल्या 'ए' रूटच्या बसमध्यें उडी मारून मी फोर्टचा रस्ता धरला. साधारणतः एकटं पीत बसण्याची मला सवय नाहीं. व्हिस्की हें गप्पा मारीत गमतीनें सोबत्यांबरोबर घ्यायचं पेय आहे असं माझं नेहमींचंच मत होतं. पण आज मला कुणाचीच सोबत सापडली नाहीं. एकट्यानेंच मी एक जवळचं रेस्टोरां गांठलं आणि तिथें थोडंबहुत खाऊन यथास्थित पीत बसलों.

" मला दारू साधारणतः चढत नाहीं हें तुम्हां सगळ्यांनाच माहीत आहे. आपल्या वार्षिक नाचाच्या रात्रीं तुम्ही सारे आभाळांत नाहीं तर पाताळांत गेला होतांत, तरी सुद्धा मी मात्र जमिनीवरच होतों आणि पीत होतों. पण त्या सायंकाळीं काय झालं कोण जाणे, पण अवघ्या अर्ध्या बाटलींत मी टेर झालों. हा एकेका दिवसाच्या प्रकृतिमानाचा गुण आहे. त्या दिवशीं मी श्रमानें अगदीं गळून तर गेलोंच होतों, पण वर अर्धपोटींही होतों. त्यामुळें ती व्हिस्की माझ्या अगदीं मस्तकांत चढली. माझ्या वृत्ति एकदम फुलून आल्या. खूपसं रडावं, हसावं आणि गावं असं मला वाटूं लागलं. कुणाला तरी आपण अगदीं जवळ घ्यावं किंवा कुणाच्या कुशींत डोकं खुपसावं, कुणींतरी प्रेमानें आपल्या केसांवरून हात फिरवावा आणि मग आपण शांतपणानें झोपीं जावं अशा एका विचित्र आणि वेड्या इच्छेनें माझ्या मनाचा कब्जा घेतला.

" मद्यपानामुळें उत्पन्न होणारी ही अवस्था तुमच्यापैकीं पुष्कळांच्या परिचयाची असेल. हा इच्छांचा आणि भावनांचा कल्लोळ, केवळ मद्यामुळें उत्पन्न झाला आहे, हें कळण्याइतका मी शुद्धीवर होतों. तरी पण त्या विलक्षण उमाळ्यावर

कब्जा करण्याइतकं सामर्थ्य माझ्या अंगीं उरलं नव्हतं. चंद्रकिरणांचीं वस्त्रें पेहेरून अनेक पऱ्या माझ्या डोळ्यांसमोर नाचत होत्या. वयाच्या काव्यमय अठराव्या वर्षी आगगाडींत भेटलेल्या एका बिजलीसारख्या पोरीची आतां मला राहून राहून आठवण येत होती. माझ्या पहिल्या तारुण्यांत मला अतिशय प्रिय असणाऱ्या एका विस्मृत गाण्याची लकेर, माझ्या कानांत एकाएकीं घुमूं लागली होती. थोडक्यांत सांगायचं गडे हो, म्हणजे केव्हांच मरून गेलेल्या पोरकट भावनांच्या पुरांत मी अगदीं पुरतेपणीं बुडून चाललों होतों आणि हें सारं होत असतांना सुद्धा मी दारूचा पेला वर उचलून स्वतःला बजावीत होतों 'मेहेरा, माझ्या मुला, ही सारी दारू आहे, समजलास ? दारू !'

"मृदु स्पर्श, रोमांचकारी उःश्वास आणि उष्ण अश्रु ह्यांच्या कल्पनेनें मी अखेर इतका वेडावून गेलों, कीं ह्याच अवस्थेचा पगडा माझ्यावर आणखी कांहीं काळ राहिला तर मी मूर्च्छित होऊन पडेन असं मला वाटूं लागलं. मी घंटा वाजवली, बिल दिलं, एकदा आरशांत पाहिलं आणि धावतच जाऊन 'बी' रूटच्या बसमध्यें उडी मारली. मला चांगलाच श्वास लागला होता आणि माझ्या कपाळावर घामाचे टपोरे थेंब उभे राहिले होते.

"ह्यानंतर मी निश्चित कोणत्या ठिकाणीं गेलों तें तुम्हांला सांगत नाहीं. बसमध्यें गार वाऱ्याचा हबका तोंडावर बसतांच तो पत्ता मला एकाएकीं आठवला. जेव्हां मी फारसा बिघडलों नव्हतों, तेव्हां माझ्या दर्दी मित्राबरोबर मी ह्या ठिकाणीं उगीच गंमत म्हणून पायधूळ झाडून आलों होतों. तेव्हां मला तिथें एखाद्या रिटायर्ड पेन्शनरासारखा दिसणारा एक संभावित म्हातारा, चांगली सुसज्ज खोली, फुलांनीं भरलेला देव्हारा आणि एक गुबगुबीत छोकरी एवढ्या वस्तु दिसल्या होत्या. तें घर कुलवंताचं नाहीं, ह्या गोष्टीवर विश्वास ठेवायलाच तेव्हां माझं मन प्रथम धजलं नव्हतं आणि ती वस्तीही अकुलीनांची नव्हती. पण कुलीन आणि अकुलीन हा भेदच ह्या मुंबईत काढणं व्यर्थ आहे. जिथें प्रत्येक मोठ्या इमल्यांत निदान एकतरी ...पण जाऊं द्या ! अशा जागांचं वर्णन मध्यस्थ नेहमीं 'खास...आणि प्रायव्हेट' अशा

शब्दांनीं करतात. पण खूण पटवून माहीतगारानें तिथें खुशाल प्रवेश करावा, इतपत त्या जागा सार्वजनिक असतात; आणि म्हणे ‘ प्रायव्हेट ’!—हं: !

“नाहीं संत, कांदेवाडी किंवा चुनाम लेनपेक्षां ती जागा दसपट चांगली होती. फक्त हे लोक सांगतात तितकी आणि तशी ती ‘ प्रायव्हेट ’ नव्हती; असणं शक्यही नव्हतं. खाजगीपणाच्या नांवामुळें भुलणाऱ्या मूर्खांच्या जादा पैशावर चालणारा तो सुद्धा एक सार्वजनिक धंदाच होता. अर्थात् परी निराळी होती. अंहं, कितीही आग्रह केलास तरी मी तुला तो पत्ता देणार नाहीं. आणि तिथलें एकूण वातावरण इतकं सुंदर आणि सोवळं आहे कीं इमारत सांगून सुद्धा त्या ब्लॉकवर नेमकं बोट ठेवणं तुला शक्य होणार नाहीं.

“त्या रात्रींही ती जागा तितकीच निरुपद्रवी, शांत आणि सुखकर दिसत होती. खोलींतलं तेंच झिलईदार फर्निचर, तोच हार्मोनियम, तींच पुष्पपात्रं, तसबिरी, आरसे आणि तो फुलांनीं खचून मंद सुगंध फेकणारा देव्हारा सुद्धा. फक्त आज तो एखाद्या भारदस्त रावबहादुरासारखा दिसणारा म्हातारा मात्र तिथें नव्हता; आणि तो तिथें नाहीं हें पाहून कां कोण जाणे, पण मला फार हायसं वाटलं.

“ह्या बायकांच्या आठवणी मोठ्या जबर असल्या पाहिजेत. कारण एकदाच आणि उगीचच तिथें गेलेल्या मला सुद्धा तिनं तत्काळ ओळखलं. तिचं वर्तन अगदीं सहज होतं आणि शालीन सुद्धा होतं. दमून घरीं आलेल्या पतीचें एखाद्या सुसंस्कृत पत्नीनें करावं, तसं तिनें माझं स्वागत केलं. तिनें माझा कोट उतरवला, मला हातपाय धुवायला गरम पाणी दिलं, टॉवेल दिला आणि मी आरामखुर्चीवर रेलून बसलों, तेव्हां ती माझ्यासमोर पदराशीं चाळा करीत आंगठ्यानें गालिचा उकरीत उभी राहिली.

“शपथपूर्वक सांगतों चौबळ, ती एखाद्या गरीब स्वभावाच्या गर्तीसारखी दिसत होती. पिवळ्या चाफ्यांच्या पाकळीसारखं तिचं रेशमी पांच वारी पातळ होतं. तिच्या ओठाला, तोंडाला, कुठेंच रंग नव्हता. गहिऱ्या डोळ्यांत काजळ नव्हतं, तरी ते काजळ लावल्यासारखे दिसत होते आणि पायांना आणि हातांना मात्र मेंदीच्या रंगानें मोठी कोमल शोभा आणली होती. अतिशय

सुंदर वेश्येच्या चेहेऱ्यावर सुद्धा दिसणारा तो धंदेवाईक, निर्लज्ज भाव तिच्या चेहेऱ्यावर थोडा सुद्धा दिसत नव्हता. आपल्या इस्पितळांतल्या किमान पन्नास टक्के तरी नर्सेस तिच्यापेक्षां जास्त भडक आणि चवचाल दिसतात.

" मी तिच्याकडे नुसता टक लावून पाहात होतों. त्या गुबगुबीत गोऱ्या पोरीला जवळ घ्यायची मला अतिशय इच्छा होती आणि तरीही मी तिला हात लावला नव्हता. तिच्या कानांतल्या हिऱ्यांच्या कुड्यांकडे, मानेवर रुळणाऱ्या तिच्या लांबट केशबंधनाकडे, रेशमांतून अधिकच उठावानें आपल्या मांसल मृदुतेची साक्ष देणाऱ्या तिच्या शरीराकडे आणि तिच्या अतिशय सालस आविर्भावाकडे मी नुसता डोळे भरून पाहात राहिलों.

" खालच्या नजरेंतून तिनेंही माझ्याकडे कांहीं वेळ पाहिलं आणि मग थोडं स्मित करीत अगदीं शांतपणें ती पायपेटीवर जाऊन बसली व जादूच्या हातांनीं सूर काढावयास तिनें आरंभ केला. योगायोगाचं मला मोठं नवल वाटलं, पण थोड्या वेळापूर्वी रेस्टोरांत माझ्या नवशिक्या तारुण्यांतलं जें गाणं मी डोक्यावर फिरणाऱ्या पंख्याकडे पाहात म्हणत होतों, तेंच गाणं तिनें जलद गतींत म्हणायला आणि वाजवायला सुरुवात केली आणि मध्येंच एकदा माझ्याकडे वळून पाहून ती मोठ्या आश्वासनपर स्नेहानें हसली.

" त्या गाण्याच्या धांवत्या स्वरांचा आणि तिच्या त्या हसण्याचा माझ्या मनावर मोठा उन्मादकारी परिणाम झाला. माझ्या साऱ्या शरीरभर एका नव्या शिरशिरीची लाट पसरली. मी खिशांतून झटक्यानें व्हिस्कीची बाटली काढली आणि मी काय करतों आहें हें तिला कळण्यापूर्वीच तें कोरं मद्य सर्वच्या सर्व तसंच पिऊन टाकलं. मला थांबवण्यासाठीं ती एकदम उठली, पण तोंपर्यंत मीच तिच्यापाशीं झेप घेतली, वाटेंतली खुर्ची लाथेनें ढकलली आणि विलक्षण आवेगानें मी तिला माझ्या बाहूंत गोळा केली. माझ्या धडपडींत तिचे आणि माझे हात पेटीवरून वेगवेगळ्या दिशेनं फिरले आणि त्या आघातानें उत्पन्न झालेलं स्वरांचं विलक्षण मिश्रण हवेंत विरून जाण्यापूर्वीच तिच्या कुशींत मस्तक ठेवून मी अश्रु ढाळूं लागलों.

"माझा त्या वेळचा सारा मानसिक अनुभव शब्दांनीं वर्णन करून सांगणं कठिण आहे. ती वेश्या आहे, हें माझ्या गांवींही राहिलं नव्हतं. माझ्यासारखे अनेक त्या शय्यागृहांत येऊन गेले असतील, ह्याचंही मला भान नव्हतं. ती एक स्त्री आहे आणि तिचा चेहेरा सात्विक आहे एवढंच काय तें मला कळत होतं. माझ्या डोळ्यांतून अश्रु गळत होते. एक परी माझ्या केसांतून बोटं फिरवीत होती. मी तिच्या सुगंधी वक्षःस्थलावर तोंड दडवलं होतं. माझ्या मनाला विलक्षण विश्वास आणि आराम वाटत होता. माझ्या डोळ्यांवर आणि गात्रांवर हळुहळू जादूची गुंगी चढत होती. मी मच्छरदाणीची निळी किनार पाहिली, दिव्याचं हिरवं आच्छादन पाहिलं, कोपऱ्यांतला व्हीनसचा पुतळा पाहिला, मी तिचं तोंड पाहिलं – आणि पाहात राहिलों. जड आवाजांत मीं तिला लाडानें कांहीं तरी अडखळत म्हटलं, तिनें पुन्हा माझं मस्तक आपल्या कुशींत घेतलं आणि ओठांनीं कसला तरी लाडका शब्द करीत ती मला थोपटूं लागली. मी एकदा अंग चाळवलं आणि माझा स्मृतिशून्य परिस्तानांत प्रवेश झाला. तिथें जातां जातां मला वाटलं कीं सारं जग कसें संतोषानें आणि सौंदर्यानें ओसंडूं लागलं आहे.

"बराच वेळ गेला असेल. सायंकाळ ओसरून रात्रीला सुरुवात झाली होती. कसल्या तरी खडबडीनें आणि घड्याळाच्या एका ठोक्यानें मी एकदम जागा झालों. आतां जगांत संतोष नव्हता, सौंदर्य नव्हतं. आभाळांतून जमिनीवर कोसळलेल्या एखाद्या मोडक्या विमानासारखं मला वाटत होतं. माझं सारं शरीर जड पडलं होतं आणि वेदनेची कसली तरी असह्य कळ राहून राहून माझ्या मस्तकांत उमटत होती. अगदीं चिडीला येऊन मी माझ्या शेजारीं पाहिलं – तों काय चमत्कार ! ती माझ्या शेजारीं नव्हती ! तिच्या वेणीवरच्चीं चार दोन बकुळीचीं फुलं मात्र उशीवर पडलीं होतीं. मी आतां अगदीं शुद्धीवर आलों होतों. तरी एका अस्पष्ट शंकेच्या आणि रागाच्या तिरीमिरीनें मला घेरलं. हा पंजाबी स्वभाव आहे. मी ताडकन् पलंगावरून खालीं उडी मारली आणि कोपऱ्यांत पडलेली एक फॅन्सी छडी हातांत घेऊन शयनगृहाचं व शयनगृहासमोरच्या एका खोलीचं दार आवेशानें उघडलं. तिथें मला चमत्कार दिसला ! सज्जन चेहेऱ्याची ती सुंदर छोकरी आतां

एका लठ्ठ गुजराथ्याच्या पुढ्यांत त्याच आदबीनें बसली होती. त्या माणसाच्या प्रत्येक बोटांत अनेक आंगठ्या होत्या. त्याच्या मानेवर कितीतरी वळ्या होत्या. त्याला हनवट्याही दोन होत्या आणि तो आपल्या लठ्ठ बोटांनीं तिचे गालगुच्चे घेत होता व ती त्याच मर्यादशीलपणें त्याच्या जवळ लाजत बसली होती. तो देखावा पाहातांच माझं रक्त मस्तकांत चढलं. साऱ्या जगावर तांबडा शिडकाव झाल्यासारखं मला वाटलं. ही पोरगी थोड्याच वेळापूर्वी मला कुशींत घेऊन माझ्या केसांतून बोटं फिरवीत होती. हिच्या दृष्टींत दृष्टि मिसळून आणि हिच्या छातीवर मस्तक ठेवून मी विश्वासानें झोपीं गेलों होतों. येतांक्षणींच मीं हिला शंभर रुपयांची नोट काढून दिली होती आणि मी अगदीं शेजारींच नशेंत आणि झोपेंत असतां ही दगलबाज......!

"दांत ओठ खाऊन मी 'बेइमान–फरेबी–!' हे शब्द जळून उच्चारले आणि छडी उगारून तिच्या अंगावर सपासप दोन चार वार केले. त्या गुजराथ्यालाही मी निरोपाचा प्रसाद द्यायला चुकलों नाहीं. छेः छेः! रात्रभराच्या मोलानें विकत घेतलेल्या वेश्येनें सुद्धा केलेला तो दगा मला माझ्या त्या मनःस्थितींत तरी मुळींच सहन झाला नाहीं. तिनें प्रथम माझ्याकडे आश्चर्यानें पाहिलं व मग ती किंचाळूं लागली.

"मी आतां पूर्ण शुद्धीवर आलों होतों. मीं स्वतःला बजावून सांगितलं, "डॉ. मेहेरा, तरुण माणसा, आतां तूं इथून जितक्या लवकर निघशील तितकं तें तुलाच बरं पडेल! पण निघण्यापूर्वी शक्य तर शेजारच्या खोलींतला तुझा कोट घ्यायला मात्र चुकूं नकोस."

"आणि त्या गोंधळांतही मी घाईनें खुंटाळ्यावरून माझा कोट ओरबडला. तीन तीन पायऱ्या एका उडींत उतरून रस्त्यावर आलों आणि सरळ एक तयार टॅक्सी गांठली.

■ ■ ■

"इस्पितळाच्या कॉरिडॉर मधून मी क्वार्टर्सकडे यायला निघालों तेव्हां रात्रपाळीच्या चारदोन नर्सेस रिवाजाप्रमाणें माझ्यापुढें येऊन हसल्या. त्यांनीं

कधीं पाहिलं नव्हतं असं माझं स्वरूप मीं तेव्हां त्यांना दाखवलं. विरक्तीनें आणि संतापानें माझं मन भरून गेलं होतं. नाहीं, अगदीं वेश्येनें केलेला दगा सुद्धा मला सहन झाला नाहीं ! ”

डॉ. मेहेराची गोष्ट संपली तेव्हां प्रत्येकजण अगदीं शांत होता. थोडा वेळ सगळेच सिगारेट फुंकीत स्वस्थ होते. त्या शांततेचा भंग करून शेवटीं मेहेरा संतला म्हणाला, “ डॉ. संत, आपल्या धंद्याची नीति न पाळणाऱ्या त्या बाईचा पत्ता तुला पाहिजे असेल तर आतां तो मी तुला देतों. गडबडींत माझे तिथेंच राहिलेले जोडे तुला परत आणतां येत असतील तर पाहा ! नर्स नाडकर्णी लग्नानंतर वावगी वागत असल्याचं जर माझ्या कानावर आलं तर तिच्या नवऱ्याला ते जोडे मी अवश्य भेटीदाखल पाठवीन ! ”

# द या !

दया ही मोठी फसवी चीज आहे. पुष्कळदा ती दांभिकतेची आई असते. पुष्कळदा तो मनाच्या दारिद्र्यावरील मखमली अभ्रा असतो. आणि दुसऱ्यावर दया करण्याचा आव आणणारा माणूस अभाविकतः स्वतःवरच दया करण्याची पुष्कळदा पराकाष्ठा करीत असतो. ज्याची स्वतःला व दुसऱ्याला न्याय देण्याची शक्ति नाहीं, तो माणूस सामान्यतः दयेचें उबदार पांघरूण तोंडावरून ओढून मोठ्या निरागस मनानें झोपीं जातो.

ह्या गोष्टी त्या त्या वेळीं प्रत्येकाला कळतातच असें नाहीं. माणसाला नुसते दुसऱ्याचेच हेतू अज्ञात नसतात, तर पुष्कळदा स्वतःच्या हेतूचाही त्याला पत्ता नसतो. मूषक सृष्टीचा नियमित भाग दररोज पोटांत रिचवून मनुष्य जातीवर दया केल्याचा व म्युनिसिपालिटीला उपकृत केल्याचा सोज्वळ कर्तव्यानंद उपभोगावयास जर मांजरांनीं सुरुवात केली तर त्यांना अगदीं चूक कसें म्हणायचें ? हा दृष्टिकोणाचा प्रश्न आहे !

माझ्या स्वतःच्या दृष्टिकोणाप्रमाणें मी आजकाल मला स्वतःला राजपुत्र सिद्धार्थ, तुकाराम, एकनाथ इत्यादि हळव्या लोकांच्या तोडीचा पुरुष समजूं लागलों होतों. माझ्यांत इतकी माणुसकी, इतकी मानवता, इतकी दयाबुद्धि असेल अशी ह्यापूर्वीं मला मुळींच कल्पना नव्हती. माझ्यांत निःसंशय असलेल्या, पण मला [ किंवा तरांना ] माहीत नसलेल्या अनेक सद्‌गुणांपैकीं एकाचा मला नव्यानेंच साक्षात्कार होत होता ; आणि मी दररोज अकरा वाजतां कोर्टांत जाण्यासाठीं आमच्या गल्लीसमोर असलेल्या चिंचेच्या झाडाखालीं आलों कीं हा साक्षात्कार मला दररोज व जोरजोरानें होई.

आमच्या गल्लीनें एका हमरस्त्याशीं तोंडमिळवणी केली आहे. त्या रस्त्याच्या कांठाशीं व आमच्या गल्लीसमोर एक चिंचेचें झाड आहे. चिंचेच्या अर्ध्या फांद्यांची सांवली शेजारींच असलेल्या मॉरिस कॉलेजच्या आवारांत पडते आणि अर्ध्या फांद्यांच्या छत्रीखालीं वाटेचे वाटसरू उन्हापावसांत आश्रय शोधतात. ज्याच्या पदरांत मी आजकाल दयेचीं व मानवतेचीं मापें दररोज

भरभरून घालीत असें, तो सामान्यतः ह्या चिंचेच्या आश्रयानें उभा असायचा.

त्याचें नांव भिकू असलें तरी तो कांहीं धंद्यानें भिकारी नव्हता. त्याची स्थिति बहुतेक धंदेवाईक भिकाऱ्यांपेक्षांही वाईट असेल; पण " भिकारी " हें त्याच्या सांपत्तिक परिस्थितीचें वर्णन झालें असतें, त्याच्या पेशाचें नव्हे. तो नांवाचा भिकू आणि धंद्याचा रिक्शावाला होता.

कलकत्ता-मद्रासच्या रिक्शांचीं आणि रिक्शावाल्यांचीं वर्णनें आमच्या पुष्कळ वाचनांत होतीं आणि ह्या मानवचलित वाहनांचीं वर्णनें वाचून आम्हीं उसासेही भरपूर सोडले होते. पण एक दिवस वाहनांचा हा प्रकार नागपुरांतही जोरावला आणि तेव्हांपासून माझी आणि भिकूची चिंचेच्या झाडाखालीं सलामी झडूं लागली.

चिंचेच्या झाडापाशींच बस उभी राही, आणि अकरा वाजतां भरल्या पोटावर पान चघळीत आणि सिगारेटचे झुरके मारीत काळा डगला अडकावून मी बसची वाट पहात उभा असें. भोजनोत्तर येणाऱ्या त्या सुखासीन अवस्थेंत मला भिकूच्या दर्शनाइतकी अप्रिय गोष्ट दुसरी नव्हती. वयानें हा मनुष्य अर्धा होता. त्याच्या हनुवटीवर एक कांटेरी खुंटांचें काळेंपांढरें पीक सदैव उभें असे. त्याचे दांत पिवळे धमक होते. डोळे पिचपिच करीत होते. बैठकीवर चिकटलेली खाकी चड्डी निव्वळ समाजाच्या शिष्ट नियमांना चुचकारण्याचा प्रयत्न करीत होती. फाटक्या बनियनमधून दिसणारा छातीचा सांपळा शरीरशास्त्राच्या कोणत्याही विद्यार्थ्याला लोभनीय वाटण्यासारखा होता आणि खवडे झांकणाऱ्या रकटेवजा टोपीनें ह्या साऱ्या देखाव्यावर कुरूपतेचा कळस चढविला होता.

रोज अकरा वाजतां हटकून चिंचेच्या झाडाखालीं सापडणाऱ्या मला भिकू अगदीं बिनचूक पछाडीत असे. मी दिसतांच तो आपल्या लंगड्या चालीनें रिक्शा ओढीत मजपाशीं येई आणि आसनस्थ होऊन कोर्टाकडे चलण्याविषयीं माझी गयावया करूं लागे. माझी गयावया करीत असतांच तो खोकत खोकत टॅक्सीवाले, टांगेवाले, इत्यादि समव्यवसायिकांचा उद्धार करण्याची संधि साधून घेई.

मीं भिकूच्या विनंतीला कधींच मान दिला नाहीं आणि त्याच्या व्याख्यानाचा गफलतींत ऐकावा लागला तेवढाच भाग ऐकला. हें दररोज मिळण्यासारखें दोन आण्यांचें गिऱ्हाईक निराशाजनक वाटावें इतकें हट्टी आहे, हें लक्षांत येतांच भिकू माझ्यासमोर त्रागा करूं लागला, रागावूं लागला व शिव्या आहेत कीं ओव्या आहेत तें कळणें कठिण जावें अशा तऱ्हेनें तोंडांतल्या तोंडांत पुटपुटूं लागला. तपस्व्याच्या शांततेनें सारें ऐकून मीं थडथडणाऱ्या बसमध्यें पाय ठेवला म्हणजे मग तो रडकुंडीला येई व दुडकत दुडकत आणखी कोणाची तरी अजीजी करायला निघून जाई.

भिकूचें तें व्याख्यान नको आणि त्याचा तो अमंगळ अवतार पाहाणें नको, असें वाटून एक दिवस हिय्या करून मीं त्याच्या अंगावर एक आणा फेकला, तेव्हां आपलें वेगळेंच स्वरूप दाखवीत तो म्हणाला,

" मी मेहेनतीचा पैसा मागतों साहेब, भीक नव्हे ! "

" मग दुसऱ्या कुणासाठीं तरी मेहेनत कर. काय दुसरे लोक रिक्शांत बसत नाहींत ? जा, एखादी मॉरिस कॉलेजांतली पोरगी नाहीं तर पोरगा पकड. हे तरुण जीव मोठे दयाळू असतात. त्यांच्या सहलीला रिक्शासारखं सोईस्कर वाहन नाहीं ! "

" नाहीं साहेब. "

" नाहीं साहेब काय ? रिक्शांत खूप वेळ खेटून बसायला मिळतं म्हणून भावनाप्रधान तरुण तरुणी त्या वाहनांत बसतात ही गोष्ट खोटी आहे ? "

" नाहीं साहेब. "

" मग काय आहे झिगझिग ? "

" म्हाताऱ्याच्या रिक्शांत कोण बसतं साहेब ? त्यांना तर जवान रिक्शावाला पाहिजे. आपल्यावरून जग ओळखा साहेब. जें तुमचं तेंच त्यांचं "

" जें त्यांचं तें माझं नव्हे गाढवा. "

" कसं म्हटलं साहेब ? "

" जवान असो कीं बुड्ढा ओढणारा असो, रिक्शांत न बसण्याचं माझं व्रत आहे. तें माझं तत्त्व आहे."

" असं म्हणतां साहेब? पण कां बरं?" कुतुहलानें व अविश्वासानें त्यानें विचारलें.

" माणसानें माणसाला ओढावं, ही गोष्ट मला भयंकर वाटते. त्यामुळें माझ्या भावना दुखावतात. ह्या देशांत आधींच प्रचलित असलेल्या शेकडों अमानुष चालींत आज ह्या नव्या पातकाची भर पडत आहे. ज्याला साधी चाल चालणं कठीण आहे, त्या तुझ्यासारख्या म्हाताऱ्याच्या उरावर माझ्यासारख्या तरुणानें बसावं? आणि तूं मला ओढावंस? काय उपयोग मग माझ्या शिक्षणाचा व संस्कृतीचा?"

" रिक्शा कांहीं पसंत नाहीं आपल्याला एकूण!" माझ्या भाषणाचा भावार्थ काढण्यासाठीं धडपडत भिकू म्हणाला.

" नाहीं!"

" मग आपण कधींच रिक्शांत बसणार नाहीं?"

" कधींच नाहीं!"

" मग इतर बाबूलोक रिक्शांत कसे बसतात! तुम्ही मला बोललांत तें त्यांना कळत नाहीं?"

" तें त्यांचं त्यांना माहीत! हवा तर तुला तो एक आणा अजून घे!"

" मला भीक नको साहेब! मला मेहेनतीचा पैसा पाहिजे!"

तेवढ्यांत दुरून बस येतांना दिसली. रागानें भिकूनें डोळे किलकिले करून तिकडे पाहिलें आणि तोंडानें कांहींतरी पुटपुटत दुडकत दुडकत तो तेथून निघून गेला.

मी खरोखरच सांगतों, मानवचलित रिक्शांचा देखावा मला आवडत नाहीं. जेथें बैल किंवा घोडा असायचा तेथें एका माणसानें स्वतःला जुंपून घ्यावें आणि उरीं फुटेपर्यंत धापा टाकून दिवसभर रस्तोरस्तीं धावावें ही गोष्टच

मला भयंकर वाटते. माझी निश्चिती आहे, कीं मी रिक्शांत बसलों तर मला इतका त्रास होईल कीं तितका त्रास प्रत्यक्ष त्या रिक्शा ओढणाऱ्या मानवी जनावरालाही होणार नाहीं.

उघड्या नागड्या पायानें धावत सुटणारा तो द्विपाद कोठें ठोकर तर खाणार नाहीं, त्याच्या पायांत कोठें कांच तर घुसणार नाहीं, दम कोंडून तो एकदम खालीं तर कोसळणार नाहीं, ह्या कल्पनांनींच मी बेचैन होईन. मी अगदीं साफसूफ आणि सुखासीन अशा रिक्शाच्या गादीवर बसलों असतां दोन दांड्यांत जखडबंद होऊन घामाघूम होणाऱ्या अथवा पावसाचा बेदम मार खाणाऱ्या, किंवा थंडीनें कांकडत धावणाऱ्या त्या माणसाचा देखावा पाहातांच माझें सुख दुखावेल. मी कष्टी व्हावें इतक्या वेदना माझ्या मनाला होतील.

कष्ट, रोग आणि यातना ह्यांचीं दृश्यें पाहाण्याविषयीं माझें मन कमालीचें कमजोर आहे. म्हणून आपली पेन्शनींत निघायला आलेली रिक्शा घेऊन भिकू दुडकत दुडकत माझ्यापाशीं आला कीं माझ्या पोटांत गोळा उठे. परंतु भिकूनें आपलें व्रत अखंड ठेवलें होतें. अकरा वाजतां मी चिंचेच्या झाडाखालीं आला कीं हबकत हबकत तो माझ्यापाशीं येई. प्रथम तो माझ्या विनवण्या सुरू करी. म्हातारे असलों, तरी धावण्यांत आपण जवानांनाही कसे मागें टाकूं शकतों तें मला पटवून देण्याचा जिवापाड प्रयत्न करी. माझा घुमेपणा पाहिला कीं त्याचा स्वर हळुहळू चिडचिडा होऊं लागे. लवकरच तो तेरीमेरीवर येई. दुरून बस येतांना दिसली कीं निकडीपोटीं उत्पन्न झालेल्या त्या त्राग्याच्या तेरीमेरींत भरपूर रडवेपणा डोकावूं लागे आणि मी बसमध्यें पाय ठेवला, कीं मान खालीं घालून तो हळुहळू निघून जाई. मला खरोखरच त्याची अत्यंत दया वाटे.

एक दिवस खूप पाऊस कोसळत होता. रस्ते निसरडे झाले होते. सर्वत्र पाण्याचीं थारोळीं साचलीं होतीं. मला कोर्टांत महत्त्वाचें काम असल्यानें छत्री घेऊन घाईघाईनें मीं चिंचेच्या झाडाखालीं आलों. मला वाटलें, आज तरी भिकूच्या उच्छादापासून मी सुटणार. पण माझें तेवढें भाग्य नव्हतें. एखाद्या ओल्या झालेल्या कावळ्यासारखा तो आपलें वाहन घेऊन तेथें इमानानें उभा होता.

एवढेंच नव्हे तर तो आज कांहीं विशेष अवसानांत होता. रोज होणाऱ्या धुसफुशीच्या सलामीमुळें कां होईना, पण माझ्यावर कांहीं विशेष अधिकार उत्पन्न झाल्यासारखें त्याला वाटे व तसाच तो वागे !

आज अगदीं अटीतटीचा पवित्रा घेऊन तो माझ्यापाशीं आला. प्रथम त्यानें माझे हात धरले. अंग शहारून मी मागें सरलों, तेव्हां त्यानें माझे पाय धरले. चकित होऊन मी म्हणालों,

" अरे, अरे, काय हें भिकू ? "

" साहेब, मी म्हातारा आहें म्हणून तुम्ही माझ्या गाडींत बसत नाहीं. पण आज मात्र मला अंतराय देऊं नका ! "

" पण झालं काय ? "

" घरवाली फार बिमार आहे. आज रुपया बारा आणे घरीं नेलेच पाहिजेत. मी म्हातारा झालों हा माझा गुन्हा झाला साहेब ? रोज आपले पाय धरतों, पण आपण कशाला म्हाताऱ्याच्या गाडींत बसाल ? "

" माझं कारण तें नाहीं भिकू. "

" सगळ्यांची एकच रीत आहे साहेब. जवानांचे धक्के सहन होत नाहींत म्हणून म्हातारं गिऱ्हाईक तेवढं मला मिळतं. पण आज गरज फार आहे साहेब. घरवाली बिमार आहे. आपण बसून तर पाहा. मोटरवानी गाडी चालवतों. "

" मला तुझी फार दया येते भिकू. पण तें शक्य नाहीं. "

" दया ? दया येते माझी ? आणि तरी पण आपण माझ्या गाडींत बसत नाहीं ? ही कोणच्या मुलखाची दया आहे सरकार ? माझा हा धंदा आहे साहेब. गिऱ्हाइकी द्याल तर पोटाला तरी खाईन. तुम्ही अशी न बसण्याची दया करतां म्हणून मी उपाशीं मरतों. दया करीत असाल तर गाडींत बसा. मेहेनतीचे दोन गंडे खाऊं द्या गरीबाला. घरवाली सख्त बिमार आहे, म्हणून हा आज अर्ज आहे. मग कसं काय सरकार ? "

" भिकूनें माझे पाय सोडले आणि नुसते हात जोडून तो माझ्यासमोर उभा राहिला. आज त्याच्या आवाजांत त्या म्हाताऱ्या मुजोरीचा लेशही नव्हता. त्याचे ओठ थरथरत होते आणि पिचक्या डोळ्यांत पाणी जमत होतें. पाऊस आणखी जोरावर आला आणि बसचा मात्र पत्ता नव्हता.

कां कोणास ठाऊक, मी मुकाट्यानें भिकूच्या रिक्शांत चढलों. भिकूनें घंटा वाजवली, अडाणी आनंदाचा एक चीत्कार दिला आणि ओल्या रस्त्यावरून रबरी चाकें फिरूं लागलीं. मीं डोळे मिटून घेतले. निसरड्या रस्त्यावर पाय घसरून भिकू पडला तर कसें होईल, ही धास्ती मला घेरूं लागली. मला बेचैन वाटूं लागलें. भिकूवर दया करण्यासाठीं मीं आजपर्यंत त्याला टाळलें, कीं माझी बेचैनी चुकविण्यासाठीं, ह्याचा मला नीट बोध होईना. दोन आणे न देणाऱ्या मानवतेपेक्षां दोन आणे देऊन रिक्शांत बसणारी मानवता अधिक व्यवहारी आणि भिकूला अधिक उपयुक्त वाटत होती, हें उघड होतें. रिक्शाचें वाहन अमानुष आहे हेंही उघड होतें. फक्त माझ्या हेतूंचा आणि दयाबुद्धीचा गोंधळ उडाला होता. डोळे मिटून आणि छातीवर हात घेऊन अपघाताची वाट पाहात मी स्वस्थ बसलों होतों. भिकूचे वांकडे तिकडे पडणारे कांटकुळे पाय मला मधूनच दिसत होते. तो घंटा बडवीत होता आणि एखाद्या निष्काळजी पादचाऱ्यावर मधूनच खेंकसत होता.

—पाऊस अधिकच जोर करीत होता.

—ओल्या रस्त्यावर रबरी चाकें फिरत होतीं.

# विश्वकर्मा चित्रालय

माझी प्रिया चंचलकुमारी हिच्याकडे फोटो पाठवायचा असल्यानें खालावलेल्या रंगेल स्वरांत मी फोटोग्राफरला म्हणालों, " हें पाहा चकणे, फोटो मात्र अगदीं ए वन् निघाला पाहिजे बरं का! अगदीं झ्याक्स्!"

चकणे फोटोग्राफरचें लक्ष कोठें होतें तें नक्की सांगतां येणें कठिण आहे. कदाचित् त्याचें लक्ष माझ्या कानाकडे असेल किंवा माझ्या कानापलीकडे असलेल्या उघड्या दंडवाल्या बाईच्या 'बस्ट' कडे असेल. मी एका जिव्हाळ्याच्या विषयावर बोलत असतां ह्या माणसानें असें थंडपणें पाहावें ही गोष्ट न आवडून मी रागावलेल्या मांजरासारखा फुसफुसत पुढें म्हणालों; "फोटो असा निघाला पाहिजे कीं तो हृदयाच्या फ्रेमींत जाऊन बसावा. नुसता फोटो पाहून competition थंड पडली पाहिजे. व्हॅनिटी बॅगचा देव्हारा, अश्रूंचा अभिषेक, लिपस्टिकचे डाग वगैरे षोडशोपचार पूजा होत राहिली पाहिजे. Get me?"

माझ्या नाजूक भावनेशीं चकणे अजूनही एकतानता पावला नव्हता. आपल्या नजरेचा कोन किंचित् बदलून तो आतां माझ्या नाकावरून पलीकडे पाहात होता. कदाचित् तो माझ्या नाकाच्या झुलत्या पुलाकडे पाहात असेल. किंवा पलीकडे टांगलेल्या एका लाथाळ नर्तकीच्या उडत्या पोटरीकडे पाहात असेल. त्याची ही निर्विकार वृत्ति सहन न होऊन मी ओरडलों, "काय म्हणतों मी?"

"काय?" तो एका 'सहा आण्यांत दहा' चित्रावलीवर डोळे फिरवीत म्हणाला.

"म्हटलं, फोटो चांगला आला पाहिजे. तुमचं लक्ष आहे कुठें?"

"तुमच्या नाकाकडे!"

लहानग्या लडिवाळांच्या परिभाषेंतील हा जबाब ऐकून माझा श्वास एकदम थांबला. माझा श्वास पुन्हा सुरू होण्यापूर्वीच एखाद्या ग्रीक तत्त्वज्ञाच्या शांतपणानें चकणे पुढें म्हणाला, " तुमचं नाक दोन सेंटिमिटर आणि दोन सुतं जास्त लांब आहे. शिवाय तें जास्त बाकदार आहे. तुमच्या अधरांच्या

बिंबफलावर टोंच मारण्याचा तुमच्या नाकाचा प्रयत्न आहे असं आपण अलंकारिक भाषेंत म्हटलं असतं. परंतु तुमच्या कांटेरी मिशांचं कुंपण आड येत आहे."

"कशाच्या ?" मीं स्वतःला नकळत जिज्ञासेच्या आहारीं जाऊन विचारलें.

"तुमच्या ओठांना बिंबफलं म्हणण्याच्या. तुमचे दांतही जरा फाजील पुरोगामी वृत्तीचे आहेत, ही गोष्ट फोटोंत सुद्धा नडणार आहे."

"म्हणजे ?"

"चुंबनसंस्थेवर ब्रह्मदेवानें बजावलेला हा कायम मनाई हुकूम आहे. त्या मुलीचे दांतही तुमच्या दांतांचं स्वागत करायला असेच पुढें सरसावले आहेत काय ? तसं असेल तर तुमचं नशीब फुटलं."

"त्या मुलीचे दांत मुळींच पुढें नाहींत. फक्त तिची अकलदाढ उपटली आहे." मी रागावून म्हणलों.

"हरकत नाहीं. मुलींना अक्कलदाढ आली तरी अक्कल येत नाहीं. दाढ गेली म्हणून नसलेली अक्कल जात नाहीं. त्या मुलीचा स्वभाव वगैरे कसा आहे ?"

"ह्या पंचायती तुम्हांला कुणीं सांगितल्या ? तिच्यावर प्रेम कुणाचं आहे, माझं कीं तुमचं ?"

"तुमचं. पण तिचं प्रेम टिकवायला तुम्हांला माझी मदत पाहिजे आहे. मिस्टर, तुम्ही विश्वकर्मा चित्रमंदिरांत आहांत हें विसरूं नका. इथें प्रथम मनाचा फोटो घेऊन मग शरीराचा फोटो घेतला जातो. सुरुवातीला तुम्ही मोठ्या उत्साहानें बोलत होतां तेव्हां मी तुमच्या मनाचा फोटो शांतपणें घेत होतों."

"मनाचा फोटो ? मनाचा फोटो ही काय क्ष किरणाची नवी तऱ्हा आहे काय ?"

"मनाचा फोटो ही मानसशास्त्रावर आधारलेली कला आहे. उदाहरणार्थ, सांगतों. इलकली लुगडं आणि पाटल्या घातलेली बाई, जरीचा रुमाल आणि

शेडा लावलेल्या पुरुषाबरोबर आली तर डोळे मिटून आम्ही त्यांना पोज् देतों. पुरुष बसलेला आणि बाई अटेन्शनच्या थाटांत खुर्चीवर हात ठेवून उभी. अप्-टु-डेट् पोकळकाष्टा तरुणी सुटांतल्या मुंछमुंड्याबरोबर आली तर आम्ही हीच पोज् उलटी करून सूटवाल्याच्या हातांत बाईचं कुत्रं देतों. सरळ काम! पुरोगामीही नाहीं आणि प्रतिगामीही नाहीं असं जोडपं आमच्याकडे आलं तर आम्हीं त्या दोघांनाही बसवून किंवा उभें करून एकमेकांच्या नाकाकडे पाहायला सांगतों. मध्यें फुलांचा गुच्छ! म्हाताऱ्या पेन्शनराबरोबर एखादी उपवर पोरगी आली तर तिच्या हातांत ग्रंथराज देऊन आम्ही तिची गार्गी बनवतों. शिवाय गाल थोडेसे टच् करून टाकतों! नवरदेवाच्या सोयीसाठीं. हॉकीटीम आली तर दोन खेळाडू निजलेले, बाकी उभे, मध्यें चेंडू आणि ढाल. ॲक्ट्रेस आली तर कायम ठशाचं हास्य आणि ठळठळीत कुंकू. उनाड सरदारणीच्या डोक्यावरून भारदस्त पदर! लेखिकेचा गाल हातावर व टांक हातांत! लेखकाच्या तोंडांत सिगरेट व शून्यदृष्टि शून्यांत! पहेलवानाची पोज् उठाबशीची व समोर गदा! रजेच्या अर्जासोबत फोटो पाठवायचा असेल तर गालांचे द्रोण झालेले, पण नोकरीच्या अर्जासोबत गालांच्या फुगीर पुऱ्या! थोडक्यांत म्हणजे मनाच्या चित्रावरून शरीराचं चित्र ठरवायचं हें विश्वकर्मा चित्रमंदिराचं वैशिष्ट्य आहे. परंतु तुमचं प्रकरण जरा भानगडीचं दिसतं. तुमचं नाक दोन सेंटिमिटर आणि दोन सुतं जास्त लांब आहे."

"बरं मग?" मीं चपापून नाक चाचपलें.

"तुमच्या मिशाही शेव्हिंग ब्रशसारख्या आहेत."

"असतील!" संरक्षणबुद्धीनें माझा हात मिशांवर आला.

"तुमचे दांत उपसलेल्या तरवारीप्रमाणं दिसतात."

"अच्छा!" बेदरकार त्रयस्थपणाचें सोंग आणून मी शीळ घालूं लागलों.

"तुमचे केस बरेच विरळ झाले आहेत. तुमचा चेहेरा खडी पेरलेल्या रस्त्याप्रमाणें खडबडीत आहे. शिवाय तोंड वाकडं करण्याची तुम्हांला संवय दिसते. तुमचा..."

" बस्स् ! बस्स् ! " लागोपाठ गोळ्या बसल्यामुळें जेरीस आलेल्या डुकराप्रमाणें मी चीत्कारलों.

" तुमचा बांधा हा Classical Hero सारखा खासच नाहीं, हेंही लक्षांत आणा ! "

" किती तोंड करतां ? जरा जीभ आवरा ! "

" आधीं कडू मग गोड ! कॅमेरा हा एकाक्ष असला तरी प्रेमाइतका आंधळा नसतो, म्हणून सांगून ठेवतों. "

" पण माझ्या दोषांसकट ती माझ्यावर प्रेम करते. With all my faults she loves me still. " मी मातृभाषेला इंग्रजीचा टेकू देऊन म्हणालों.

" With all your faults म्हणजे नाकाची दोन सेंटिमिटर आणि दोन सुतं जादा लांबी, फिसकारलेल्या मिशा, पुढें आलेले दांत, वगैरे ? "

" तुम्ही फोटोग्राफर आहांत कीं हजाम आहांत ? "

" मी Psycho–Cameraman आहें. बायकांची जात चंचल आणि चोखंदळ असते. आपल्या दोषांची निर्भेळ जंत्री त्यांच्या हवालीं करण्यांत अर्थ नाहीं. चांगला फोटो पोरीकडे पाठवा म्हणजे तिला तुम्ही चांगले वाटाल. By the way, मी हजाम नाहीं. "

" मी आजच तिला चांगला वाटतों. "

" ह्यः ! असं प्रत्येकच प्रेम्याला वाटतं ! "

" माझ्यापूर्वीं होऊन गेलेल्या बारा उमेदवारांच्या बाबतींत झालं नाहीं तें माझ्या बाबतींत झालं आहे. ती सहा महिने मला चिकटून आहे. आणखी नुसता आठ दिवस बाहेरगांवीं गेलों तर फोटोसाठीं जीव टाकत आहे. "

"मिस्टर, फोटोग्राफर आणि डॉक्टर ह्यांच्यासमोर लप्पम्–छप्पम् करणं हितावह नाहीं. बाळंतिणीनें सुइणीसमोर लाजूं नये. तुमच्या पूर्वींच्या बारांची जी गत झाली ती तुमची होऊं नये म्हणूनच तुम्ही हा फोटोचा रखवालदार पाठवतां आहां, खरं ना ? मग तो शक्य तितका चांगला पाठवा. आपला

फोटो हुबेहूब आपल्यासारखाच निघावा असा हट्ट धरणारं गिऱ्हाईक मीं अजून पाहिलं नाहीं. म्हणूनच आरशाच्या तोंडाला तोंड न देणारीं माणसं कॅमेऱ्या-समोर आनंदानें दांत विचकतात. दोषांची वजाबाकी आणि गुणांचा गुणाकार हें विश्वकर्मा चित्रालयाचं वैशिष्ट्य आहे."

"दोषांची वजाबाकी आणि गुणांचा गुणाकार!" मी दांतांवर पेन्सिल मारीत त्या महापुरुषाचें सूत्रवाक्य स्वतःशीं बडबडलों. खरेंच सांगायचें म्हणजे त्याच्या तर्कशुद्ध वक्तृत्वानें माझ्यावर परिणाम केला होता.

"Exactly. चंद्र दाखवायचा पण डाग नाहीं. कमळ दाखवायचं पण चिखल नाहीं. हत्तीण दाखवायची पण तिचे दांत, कंबर, कान, कांहीं नाहीं. नुसती तिची काव्यांत अमर झालेली चाल दाखवायची!"

"अस्सं!" मी दिपून जाऊन म्हणालों, "मघां मीं तुम्हांला हजाम म्हटलं त्याविषयीं मला क्षमा करा!"

"Don't mention it! अहो प्रेम्याचं बोलणं कुणी मनावर का घेतो! बाकी मीं पाहून ठेवलं आहे, माझा मुद्दा बायकांना फारच पटकन् पटतो. नुक्तीच एक मानवी म्हैस माझ्याकडे येऊन गेली. तिलाही मला वाटतं, आपल्या प्रेम्यालाच फोटो पाठवायचा होता. लागलीच मीं त्या म्हशीची उर्वशी बनवली. सिंहकटी, गजगती, वरारोहा, सुमध्यमा वगैरे झाडून सर्व! त्या बयेनें आरशांतलं आपलं प्रतिबिंब नाकारलं आणि विश्वकर्मा फोटोग्राफर्सनीं निर्माण केलेली छबी मात्र उराशीं धरली. तत्त्व तेंच! दोषांची वजाबाकी आणि गुणांचा गुणाकार!

"गुणांचा गुणाकार! बरं, मी कांहीं तुमच्या म्हणण्याबाहेर नाहीं." मी नम्र स्वरांत म्हणालों. त्याच्या डिक्टेटरी वाणीनें मला चीत केलें होतें.

"That's right! तुमचं डोकं वास्तविक सोललेल्या नारळासारखं आहे..." तो पूर्वपदावर आला.

"ही:–ही:–" मी कडू तोंड करून हसलों.

"दातावर आपण रुमाल धरूं."

“खीः–खीः–!”

“मुरमाड तोंड तेजःपुंज करूं!”

“ह्यः–ह्यः!”

“कॅमेऱ्यासमोर तोंडाची चौकट करून हसण्याचा जरी रिवाज असला तरी तुम्ही इतकें हसूं नका, तुमचे दांत दिसतील.”

“बरंऽ” माझा आवाज घोगरा झाला.

“नाक जरा कमी करावं लागेल.”

“हं!”

“फोटो अगदीं झ्याक्स् निघेल. ब्रह्मदेवानें कित्ता गिरवावा. नेत्राचं निरांजन, अश्रूंचा शॉवर बाथ, लिप्स्टीकचे डाग, काय बिशाद आहे तिच्याजवळ तुमचा फोटो असतां दुसरा पुरुष जवळ फटकेल!”

“होः! होः! होः–”

“आतां आपण तयार व्हा—!”

—चकणे फोटोग्राफरनें आपलें खापरतोंड काळ्या फडक्यांत घुसवलें व चंचलकुमारीचें नांव घेत मी ध्यानस्थ झालों.

“वन्–टू–थ्री–थँक्यू! उद्यां पंचवीस रुपये घेऊन या व फोटो घेऊन जा.”

“पंचवीस रुपये फार झाले!”

“प्रेम्यांना असा भाव करणें शोभत नाहीं. विश्वकर्मा चितााऱ्याचे हेच रेट्स् आहेत. प्रतिसृष्टि उत्पन्न करावी लागते. अच्छा उद्यां!”

  

चकण्यानें हातांत दिलेला फोटो सक्रोध कौतुकानें निरखीत मी म्हणत होतों—
“हें नाक माझें नाहीं.”

“कबूल, हें नाक Classical आहे.”

“पण तें माझें नाहीं. तसेच हे डोळे—’

" डोळे उत्तम आहत. बंगाली आदर्श ! "

" पण ते माझे नाहींत. आणखी हे अवयव– "

" ते खास अजिंठ्याच्या लेण्यांतून आयात केले आहेत. "

" असतील. मी अजिंठ्याचा रहिवाशी नाहीं. वेरूळचाही नाहीं. "

" नसाल. पण फोटो कमाल सुंदर साधला आहे. जरा कलेकडे पहा ! "

' हा फोटो माझा नाहीं. तुमच्या कलेची तारीफ करावी कीं अकलेची करावी तें मला कळत नाहीं. "

" दोषांची वजाबाकी आणि गुणांचा गुणाकार हें माझें ब्रीदवाक्य आहे. तुमच्यांतले सारे दोष वजा केल्यावर शिल्लक कांहींच उरत नाहीं हें लक्षांत आल्यामुळें ही छबी मला उत्पन्न करावी लागली. तसें करतांना मला फार प्रयास पडले आहेत ! "

" इतक्या प्रयासानें माझा खून पाडण्याची तुम्हांला गरज नव्हती. "

" मीं तुमचा खून केला नाहीं, तुमचा पुनर्जन्म केला आहे. तुमचं नाक वास्तविक दोन सेंटिमिटर व दोन सुतें— "

" पण तें माझं नाक होतं. माझ्या नाकावर माझं प्रेम होतं, तो माझ्या व्यक्तित्वाचा भाग होता. "

" पण, प्रेमाच्या माणसाला बहाल करण्यासारखी ती वस्तु नव्हती. मीं काल केलेलं सारं विवेचन इतक्या लवकर तुम्हीं विसरलांत ही खेदाची गोष्ट आहे. मला चौपाटीवरचा फडतूस फोटोग्राफर समजूं नका. मी Psycho-Photographer आहें. माझ्या सहनशीलतेचा अधिक अंत न पहाल तर बरं ! "

" अहो, पण हा फोटो माझ्यासारखा दिसत नाहीं ! "

" तुमच्यासारखा दिसत नाहीं ? तर मग फोटोवर नांव घाला आणि लिहा To...With love ... eternal ... from ... आणि मारा सही, आणखी द्या पाठवून ! इतकं ऐकलंत तर येवढंही ऐका. अरे मुला, मी तुला तुझ्या हिताची गोष्ट सांगतों ! "

“ खरंच कां माझ्या अल्प गुणांचा गुणाकार तुम्हीं ह्या चित्रांत केला आहे ?” विनवण्या आणि दरडावण्या ह्यांच्या योग्य मिश्रणानें बनलेल्या त्याच्या संवाद-पद्धतीपुढें विरघळून मी म्हणालों.

“ अलबत् ! प्रत्येक म्हशींत उर्वशी बीजरूपानें वास करते हें तत्त्व जितकं खरं आहे तितकंच प्रत्येक माणसांत मदनाचा वास असतो हें तत्त्व खरं आहे. सारा प्रश्न कलात्मक निर्मितीचा आहे. त्या लठ्ठ बाईला जें तत्काळ कळलं तें तुम्हांला कळून सुद्धा वळूं नये म्हणजे आचंब्याची गोष्ट वाटते ! खप्पड माणसाचा चेहेरा फोटोंतही खप्पड दिसला, नकट्या माणसाचं फोटोंतलं नाक वास्तवतेच्या अतिरेकानें त्याच्या संतापास कारणीभूत झालं तर मग आम्हां कलावंतांची मातब्बरी ती काय राहिली व जगाच्या सुखांत आम्हीं भर कसली घातली ? ”

“ ऐका चकणे, प्रेमाचे बारा प्रयोग केल्यानंतर तिच्या प्रेमास व आदरास पुरेपूर सहा महिने पात्र झालेलं मी तेरावं रसायन आहे. हा फोटो—” इथं मीं तोंड वांकडें केलें.

“ तोंड वांकडं करूं नका. हा तुमचा फोटो. ”

“ हा माझा फोटो, आमच्या सुखांत भर घालील अशी आशा आहे. पाठवतोंच तर मीं तो आतां तिला. त्या जगन्नियंत्यापाशीं आतां तुम्हीं माझ्या नांवानें प्रार्थना करा. ”

“ तथास्तु ” च्या पवित्र्यांत त्या महाभागानें उचललेला हात मला निरोप देण्यासाठीं तसेंच बिल वसूल करण्यासाठीं होता !

■ ■ ■

—विरहानें हैराण झाल्यामुळें रात्रीच्या प्रहरीं तारे मोजण्याचें कंटाळवाणें काम करीत झोंपीं जाण्यास किंवा उष्ण उसासे सोडण्यास चंचलकुमारीनें मला अवधीच दिला नाहीं. माझा फोटो माझ्यापेक्षां किती भाग्यवान्—त्याला प्रियेचा सहवास लाभेल, तिच्या अश्रूंचें स्नान त्याला घडेल, तिच्या लीप्-स्टिकचा रंग त्याला लागेल वगैरे विचार फोटो काढण्यापूर्वींच माझ्या मनांत येऊन गेले असल्यामुळें तोही विरंगुळा मला नव्हता. शिवाय रजिस्टरनें पाठविलेल्या

फोटोची रसीद हातीं येण्यापूर्वीच मनचे मांडे खाणें सयुक्तिक नव्हे, असें वाटल्यामुळें तो नाद सोडून मी पोस्टमनची वाट पहात होतों. परंतु पोस्टमननें रसीद देण्याऐवजीं एके दिवशीं माझा मृत्युलेख माझ्या हातीं आणून दिला. ती चंचलकुमारीनें फोटो पावताच तांतडीनें केलेली व तिच्या निर्लज्ज, दगाबाज, बेइमान हृदयाची साक्ष देणारी लांबलचक, महागरी, तार होती. तिचा [ म्हणजे त्या तारेचा ] मराठी तर्जुमा असा :—प्रिय मित्र, वाईट वाटतें–आपलें–आतां–नातें–शुद्ध–बंधुत्वाचें. फारच–तर–मित्रत्वाचें. कारण, तूं–ज्या–तरुणाचा फोटो–चुकून–मला–पाठवलास (हो–य ! चु–कू–न–च !) त्याच्यावर–माझें–प्रथमदर्शनीं–मनापासून–प्रेम–बसलें आहे. मला–विसरून–जा. पण–मला विसरण्यापूर्वीं–त्या स्वरूपसुंदराचा–पत्ता–पाठव. (पाठवच ना ऽऽ) वादविवाद–नको–पत्रापत्री–नको. निकाल–अखेरचा. तो रूपसुंदर न मिळाला तर–फोटो–बरोबर–**स–ती** ! !

—रागानें वेडा होऊन, मुठी वळून व मुठींत ते तारेचे रीमभर कागद घेऊन मी तडक विश्वकर्मा चित्रालयांत धांवत गेलों, व कसल्या तरी काळ्या कांचेकडे निर्विकार नजरेनें पाहणाऱ्या चकण्याची मान धरून भेसूर व हृदयविदारक (पण विशेषतः भेसूरच) स्वरांत ओरडलों—" चांडाळा ! काय केलंस हें !"

" काय ?" तो निर्विकार शांतीचा सागर न डहुळतां पुसता झाला—

" काय, काय, काय ? माझ्या प्रेमाचं एकुलतें एक निगेटिव्ह फोडून टाकलंस ! माझ्या प्रणयाच्या स्टुडियोला आग लावलीस ! प्रेमाच्या फुलत्या बागशाहींत आश्रमांतल्या उपाशीं बकऱ्यांचा कळप सोडलास !"

" अर्रर्र ! माझी मान सोडा ! काय झालं काय पण ?"

" चांडाळा, आतां काय व्हायचं राहिलं आहे ?" स्वतःच्या छातीवर हात व चकण्याच्या छातींत त्याच हाताची बुक्की मारून मी म्हणालों—

" दिवाळीची होळी झाली ! बोहल्याचं कबरस्तान झालं ! बुंदीचा लाडू म्हणून हातांत घेतला आणि त्याचा बॉंब झाला !"

" पण म्हणजे नक्की काय झालं ?" तो गुदमरलेल्या आवाजांत म्हणाला.

" कर्मनिष्ठा, वाच – हें डोळे फोडून वाच ! " त्याचें मानगूट गदगदां हलवत व त्याच्यासमोर तारेचे कागद धरून मी विक्रांतासारखा गजरलों.

त्या तारेंतील एकेका शब्दासरशीं चकण्याच्या लुळ्या पडलेल्या अंगांत पहातां पहातां ताठरपणा येऊं लागला. त्याचे दंड स्फुरण पावले, मान ताठरली, पाय पक्क्या पायावर उभे झाले व मला परिचित असलेल्या विनवणीवजा हुकूमशाही स्वरांत तो म्हणाला—" आधीं माझी मान सोडा बरं — सोडा माझी मान ? अस्सं, आतां माझे आभार माना ! "

" कशाबद्दल ? माझ्या प्रेमाच्या ताजमहालखालीं सुरुंग लावल्याबद्दल ? माझ्या प्रणयसागरांत यू–बोटी सोडल्याबद्दल ? अनुरागाच्या अनुपम उद्यानांत— "

" खामोष ! नाटकीपणा बस्स झाला. एका बेइमान बाईची मी वेळींच तुम्हांला ओळख पटवून दिली आहे. म्हणे माझ्या दोषावर तिचं प्रेम आहे. माझ्या दोषांसकट माझ्यावर ती प्यार करते. ह्यः ! जी गमावण्याच्याच लायकीची होती ती गेली; झालं ! त्यांत येवढं रडण्याओरडण्यासारखं काय आहे ? " एका घाटदार शरीराच्या पहेलवानी फोटोवर नजर लावून चकणे म्हणाला.

" आणि माझं प्रेम ? मी आतां कसा जगूं ? कशासाठीं जगूं ? " न्यू थिएटर्सच्या पात्रांना पाठ असलेली विलापवजा तान आलापून मी विव्हळलों.

" कशासाठीं जगूं ? शक्य तर तुम्ही जगूंच नका ! पण तुम्हांला निमित्तच पाहिजे असेल तर तें मी तुम्हांला देतों. ती बाई जर एका फोटोसाठीं सती जाऊन मरूं शकते तर तुम्हीं एका फोटोसाठीं खासच जगूं शकाल. अरे गण्या, आंतून जरा तो फोटो घेऊन— "

—पण चकण्याचें हें वाक्य पूर्ण होण्यापूर्वींच धुळीनें भरलेली एक मोटर भर वेगानें व " कर्रर— " असा आवाज करीत स्टुडियोसमोर शिंग फुंकत खडी झाली. चकणे मोटारींतल्या गिऱ्हाइकाचें स्वागत करण्यासाठीं बाहेर धांवला व गण्यानें समोर आणून ठेवलेल्या फोटोचा अम्मल माझ्यावर चढूं लागला. कुठें हे ह्या सुंदरीचे खंजनेत्र व कुठें ते चंचलेचे घारे पिचके डोळे ! कुठें ह्या

ललनेचें नवथर शरीर आणि कुठें तो चंचलकुमारीचा बीअर–बॅरल सारखा बांधा ! कुठें ह्या सुंदरीच्या धनुष्याकृति भुंवया आणि कुठें त्या चंचलेचे कांटे चमचे ? कुठें ह्या कुलकामिनीच्या चेहेऱ्यावरचा शालीन भाव आणि कुठें त्या उठवळ भवानीच्या मुखड्यावरचा बाजार–भाव ? बस्स ! ठरलें ! चटोर चंचलेला हाच माझा प्रणाम !

बाहेरून बुटांचे आवाज आले व त्या फोटोंतल्या छबीवर डोंगळ्यासारखी डकलेली माझी नजर दूर न करतां मी भावनोत्कंठ स्वरांत ओरडलों—

"चकणे ! कसंही करा, कांहींही करा, पण ह्या फोटोंतील ओरिजिनल माणूस मला दाखवा !"

"त्रिखंड धुंडावं लागलं तरी पर्वा नाहीं, तारा करा, स्पेशल ट्रेन्स सोडा, विमानं उडवा, पण तेवढं त्या फोटोंतलं ओरिजिनल माणूस भेटवून मला चुडेदान द्या. माझ्या लिप्स्टिकची आणि नेलपेंटची लाज राखा, चकणे !"

—मी दचकून वर पाहिलें. बायकी आवाज !

"चंचल, कवटाळणी ! नुसती तार करूनच तुझं समाधान झालं नाहीं. त्या स्वरूपसुंदराच्या शोधासाठीं मोटार सोडून इथं येऊन तडफडलीस ?"

"आणि त्या राजसाचा फोटो पाठवून माझ्या जिवाला जी आग लावलीत तेवढ्यानें तुमचा आत्मा थंड झाला नाहीं ? माझ्या रायाला मी रानोमाळ धुंडत असतां आपलं तोंड घेऊन इथंही अपशकून करायला आलां ?"

"आणि चांडाळणी ! ह्या गुलाबकळीच्या छबीचं मी ध्यान करीत असतां तूं आपलं धिरड्यासारखं थोब्राड घेऊन इथं आलीस ?"

"शांत व्हा मिस्टर,–शांत व्हा मॅडम—" आपल्या एकेक हातानें आम्हांला थोपवून चकणे बोलूं लागला. "कमरेवरच कळसा असतांना गांवाला वळसे घालत बसणें इष्ट होणार नाहीं."

"म्हणजे, What do you mean?" मी म्हणालों.

"आजचा सुप्रसंग देवानें आपणांस दाखविला याविषयीं त्या प्रभूचे आपण आभार मानूं या !" माझ्याकडे लक्ष न देतां चकणे म्हणाला.

" But what do you mean? मला ह्या त्रिभुवन सुंदरीचं दर्शन अजून व्हायचंच आहे!" चकणेचा एक हात ओढीत मी म्हणालों.

" आणि मलाही ह्या भुवनसुंदराचं दर्शन घडायचंच आहे!" चकण्याचा दुसरा हात ओढीत चंचला म्हणाली.

" मला ह्या फोटोंतली सुंदरी मिळाली नाहीं तर मला क्षय लागेल!" मी त्या रमणीच्या चित्रावर गाल ठेवून म्हणालों.

" आणि मला त्या फोटोंतला रूपसुंदर मिळाला नाहीं तर मी झुरून मरेन!" चंचला माझा फोटो हृदयाशीं धरून म्हणाली.

" शांत व्हा! शांत व्हा! प्रेमी जनहो, शांत व्हा!" चकणे मंत्र म्हणणाऱ्या ऋषीच्या गंभीरपणानें बोलूं लागला. " तुम्हांपैकीं कुणींच मरण्याची घाई करण्याचं आतां कारण नाहीं. एकमेकांस अत्यंत अनुरूप असणाऱ्या तुम्हां दोघांचे हात मी मोठ्या आनंदानं आतां परस्परांच्या हातांत अडकावतों!" —तसें करत चकणे म्हणाला.

" पण मला ही नको! मला ह्या चित्रांतलं मूळ माणूस पाहिजे आहे!" मी जिवाच्या आकांतानें ओरडलों.

" आणि मलाही हे नकोत! मला ह्या चित्रांतला मूळ माणूस हवा आहे!" चंचला हृदयद्रावक स्वरांत हंबरली.

" मिस्टर, तुमच्या फोटोंतलं मूळ माणूस हें!" चंचलेकडे बोट दाखवून चकणे आर्द्र स्वरांत म्हणाला. " आणि मॅडम, तुम्हीं मोठ्या प्रेमानं हृदयाशीं धरलेल्या चित्राचं ओरिजिनल हें!" चकण्यानें माझ्याकडे बोट दाखविलें व तें तसेंच रोखून ठेवलें.

मी आश्चर्यानें तोंड उघडलें व मिटलें!

चंचलेनें आश्चर्यानें " आ " वासला व तो तसाच ठेवला.

चकणे आम्हां दोघांकडे आळीपाळीनें सकौतुक पहात होता.

त्याच्या वृत्तींत क्षणाक्षणाला वात्सल्यरस भरत होता. आमचे हात परस्परावर दाबून धरण्यांत त्याला अखेर यश आलें व कांहीं क्षण शांत राहिल्यावर तो मंद गतीनें पुढें बोलला—

" मॅडम, गुणांचा गुणाकार व दोषांची वजाबाकी हे माझं सूत्र आठच दिवसांपूर्वीं तुम्हीं ग्रहण केलं होतंत. त्याचप्रमाणें मिस्टर, म्हशी व उर्वशी ह्यांच्यासंबंधीं आपला झालेला talk तुमच्या लक्षांत असेलच !

" तुम्हां दोघांच्याही मनोकामना पूर्ण करून तुमच्या पुनर्मीलनास मी कारणीभूत झालों. ह्या विषयीं अल्प फेड म्हणून तुम्हीं दोघांनींही आतां कॅमेऱ्यासमोर यावें ! हा फोटो खास मॅरेज कन्सेशन दरानें काढण्यांत येईल— चंचलाबाई, तुम्ही खुर्चीवर बसा ! मिस्टर, तुम्ही कुत्रं घेऊन त्यांच्यामागें उभे रहा. हां–! वन्–!

# व्यथा

" तलखी झाली कीं वारा घ्यायचा, थंडी वाजली कीं ऊब शोधायची आणि जीव दुखला कीं उपचार करायचा, हें चार सामान्य माणसांचं भाग्य झालं. पण हें भाग्य सगळयांच्याच वांट्याला येतं असं नाहीं. सुख आणि दुःख ह्यांतला भेद शोधायला सुद्धा सवड आणि वाव नसणारीं कांहीं मनं असतात. तलखी झाली तरी तीं वाऱ्याची आशा धरत नाहींत, थंडी वाजली तरी तीं ऊब शोधत नाहींत आणि जीव दुखला तरी कधीं उसासा सोडत नाहींत. नवसासायासाचं दुःख असेल तर तें उसासा सोडून हलकं होईल, पण जें जन्मालाच लागलं तें जीव जाईपर्यंत कुठून संपणार ? आणि मग त्याचं कौतुक तरी कशाला करायचं ? ओठावर ओठ आवळून रोजचा रामरगाडा उपसत मरेपर्यंत तें मुकाट्यानं सहनच केलं पाहिजे. नुसतं मनाचं दुःख नाहीं, तर शरीराचंही !

" सोनूच्या मनाच्या दुःखाची गणती कुणी ठेवली होती ?–तिची तिनं सुद्धा नाहीं. सुख मोजतां येतं. अपरंपार सुख सुद्धा मोजतां येतं. आणि त्याचं मोजमाप करतांना दुणावत जाणाऱ्या सुखाच्या वेळाचा हिशेब सुद्धा लवकर संपतो. पण ह्या असल्या दुःखाचा अंदाज जन्माच्या मापानं मोजून तरी कुणाला करतां आला आहे ? सोनूच्या चेहेऱ्यावरून आणि तिच्या त्या पांढऱ्या फटफटीत कपाळावरून सुद्धा कुणाला नीटशी कल्पना आली नसती. विधवा, मास्तरीण, तरुण आणि एकटी...यमूच्या सोबतीला कांहीं त्या अर्थानं महत्त्व नव्हतं. ती सुद्धा तशीच होती. विधवा, मास्तरीण, तरुण आणि अनाथ ! एक पुरुष आणि स्त्री एकत्र आली तर एक वेगळंच विश्व उत्पन्न होतं, पण एकाच शाळेंतल्या दोन मराठी मास्तरणींनीं एकमेकांच्या आश्रयानं कुठल्या तरी कुग्रामांत एकत्र राहणं, म्हणजे नुसती दोन शून्यांची सोबत ! विधवा, मास्तरणी, तरुण आणि एकट्या !...मनाला थोडासा निस्संगपणा शिकवला असता, जें पुष्कळ ठिकाणीं सुटलं आहे, तें सोनू आणि यमू यांनींही सोडलं असतं, तर ह्या दुःखाचं कारणच नव्हतं. शाळा समितीच्या प्रमुखांशीं ओळख ठेवणं—टंवकारून पाहणारांच्या डोळ्यांना बेगुमान नजर देणं—भिंतीवरचे

लेख पाहून धसका घेण्याऐवजीं स्वतःच फिदी फिदी हसणं...आणि—पण तो त्यांचा मार्गच नव्हता. बाहेरच्या जगांत वर मान न उचलणारी आणि परक्यासमोर तोंडाला खीळ घालणारी सोनू, घरच्या आणि ऋणानुबंधाच्या माणसांसमोर मात्र पुष्कळसं हसत असे. खरंच, तिथ सुद्धा सोनूनं इतकं हसायला नको होतं. म्हाताऱ्या वयांतही सोनूचे वडील अगदीं अभाळासारखं हसत असत. दरवर्षी कुटुंबांत नियमानं भर घालणाऱ्या तिच्या भावाचं तोंड सदा खदखदत असे—पण सोनू—ती इतकी हसत राहिली नसती तर बरं झालं असतं असं त्या दोघांनाही वाटे.

" पांच पंचवीस कोसांवर आडवं गंध लावून आणि तांबूस धोतर नेसून दहापांच एकरांची रुटूखुटू शेती करीत बसलेल्या सोनूच्या वडिलांनीं चष्म्यावरून पहात तिला वारंवार सांगितलं होतं—" सोने, बायकांच्या जातीनं असं उठल्यासुटल्या हसूं नये ! " मुंबईच्या " ॲडाम मिल " मधें जॉबरच्या पदवीपर्यंत चढलेल्या तिच्या लहान भावानं सुद्धा चिडचिड्या स्वरांत तिला हेंच म्हटलं होतं–" ताई, तूं उगीच इतकी हसत जाऊं नकोस बुवा ! " तरीही सोनू अजून हसतच होती, अगदीं थोड्या कारणानं आणि पुष्कळदां कांहीं कारण नसतांना सुद्धां ती पट्कन हंसून जाई.

अगदीं लहानपणापासून एखाद्या खळखळणाऱ्या झऱ्याप्रमाणें पुष्कळ आणि निर्मळ हसण्याचा तिचा स्वभाव होता. एखाद्या तांब्याच्या लख्ख घासलेल्या खणखणीत भांड्याप्रमाणें तिचं तें रूप, तो स्वभाव आणि तें तारुण्य —खरोखर, पाहणाऱ्याच्या पोटांत नुसतं तुटूं लागे. सोनूचे अण्णा एक तऱ्हेवाईक प्रकृतीचे तत्त्वज्ञ होते. अंधेर संपण्याची आशा नसली म्हणजे माणूस रात्रीचे तास मोजत नाहीं आणि रडण्याला जो अर्थ नसतो तो पुष्कळदां हसण्याला असतो, हें त्यांना उमगतं होतं कीं नव्हतं कोण जाणे ! पण सोनूच्या आईला मात्र कळलं होतं कीं वयाच्या सोळाव्या वर्षी पोरीचं कुंकूं पुसलं तेव्हांच तिच्या हसण्यांतला जीव गेला आणि आतां रड म्हणून म्हणणाऱ्या दैवाला वेडावणारी एक शरीराची सवय तेवढी शिल्लक उरली आहे !

शरीराची ती क्रिया निदान ह्या जन्मापुरती तरी विसरली जावी, येवढं सोनूच्या आयुष्यांत भरपूर घडलं होतं. आजही घडत होतं.

अगदीं पोरवयांत जेमतेम तोंडओळख दिल्यावर सोनूचा नवरा वारला आणि ओघळणाऱ्या मंगळसूत्राबरोबर धरणीवर आंग टाकून सोनूनं एकच हंबरडा फोडला. त्यानंतर पुष्कळ महिने सोनू कधीं धड झोपली नाहीं, कधीं धड जेवली नाहीं, आणि तिनं कधीं तोंडांतून अक्षर काढलं नाहीं. वर्ष दोन वर्षं तिच्या अण्णांनीं तिला खेड्यावर आपल्याजवळ आणून ठेवलं, तेव्हां सोनू खूप राबली, खूप रडली आणि आंतल्या आंत मरून गेली. ह्या अवकाशांत ती बरीच गंभीर झाली, तिचं वय कांहीं वर्षांनीं वाढल्यासारखं दिसूं लागलं आणि आतां ह्यापुढें ही कधीं काळीं हसेल, असं कुणाला वाटलं नाहीं. आणि मग एक दिवस वळकटीला टेकून लांब कुठें तरी पाहात तिचे अण्णा तिला म्हणाले, “ सोनू, मी तुला आतां पुण्याला कऱ्यांच्या शाळेंत ठेवणार आहें. माझी स्थिति तुला माहीतच आहे. तसं पाहिलं, तर तुला भाऊ आहे, वहिनी आहे, तुझे दीर आहेत; पण बाईग, जग मोठं कठीण आहे. आजच मी तुझ्या सासरच्या माणसांना पत्र धाडून कळवतों. ”

सोनूच्या सासरचीं माणसं मोठीं स्त्रीशिक्षणाभिमानी होतीं असं नाहीं, पण त्यांना आतां नसती कटकट नको होती. सोनीचे वडीलही कांहीं कर्ते सुधारक नव्हते, असलेच तर ते सनातनी होते, पण त्यांनाही सनातनधर्मापेक्षां सनातन व्यवहार जास्त चांगला कळत होता. स्वतःच्या खेड्यापासून जवळच असलेल्या दक्षिण मराठा प्रदेशांतीला एका मोडकळीस आलेल्या गांवीं मराठी सात बुकं शिकून सोनी मास्तरीण झाली म्हणजे तात्या आणि बनीसारखीं आपलीं चिल्लींपिल्लीं शिक्षणासाठीं पुढं तिच्याच स्वाधीन करावीं, असा अण्णांचा प्रथमपासून विचार नसला, तरी नंतर तो त्यांना स्वच्छपणें सुचला होता. आणि त्यांनीं तो अमलांतही आणला होता.

सोनी शिक्षण संपवून पुण्याहून परत आली, तेव्हां तिचं हसूंही परत आलेलं पाहून तिच्या आईनें उसासा सोडला आणि अण्णांना आश्चर्य वाटलं. सोनूच्या अंगांत आतां जास्तच काम आलं होतं, जास्तच टापटीप आली

होती आणि जास्तच भारदस्तपणा आला होता. अश्रूंनीं तिची कांति बरीच धुऊन नेली होती, तिच्या चेहेऱ्यावर कडवेपणा आला होता, आणि तिच्या कानशिलाजवळची शीर आतां पुष्कळदा स्पष्ट दिसत होती. अगदीं प्रशांत दिसणाऱ्या जलाशयावर एकाएकीं तरंग उठून पुन्हा तो जलाशय निस्तब्ध व्हावा, तसं आतां सोनूचं आकस्मित हसणं असे. तें हसणं सोनूच्या वडिलांना समजलं नाहीं आणि सोनूच्या आईला पटलं नाहीं. सहज पाहाणाऱ्याला कळलंही नसतं. पण सोनूचं हसणं आतां वर उसळणाऱ्या झऱ्यासारखं नव्हतं, तर खोल गेलेल्या विहिरीसारखं होतं. सोनूच्या अण्णांनीं आनंद येवढ्याचसाठीं मानला कीं कर्व्यांच्या संस्थेंत आणि पुण्यासारख्या फाजील शहरांत राहूनही सोनू भलभलत्या सुधारकी कल्पना शिकून आली नाहीं. व्यंकटेशस्तोत्र, नऊवारी लुगडं, टिनाच्या गुंडीची चोळी, सोमवार शनिवारचे उपास, भुईवरची दृष्टि, सारं तिनं जसंच्या तसं शाबूत ठेवलं.

" यमू आणि सोनू बरोबरच शिकल्या, आणि त्यांची एकाच ठिकाणीं नोकरी करून एकत्र राहाण्याची कल्पनाही अण्णांना फार आवडली. शिकत असतांना सोनूला आपल्या बापाच्या दारिद्र्याचा तरी आधार होता, पण यमूला तेवढंही समाधान नव्हतं. पटकीच्या एकाच साथीनं सतराच्या वयांत तिचं सगळं सासरमाहेर निकालांत काढलं. तिकडे वऱ्हाडनागपूरकडे तिचे बरेच काका–मामा चांगल्या सुस्थितींत होते आणि जिवाच्या विरंगुळ्यासाठीं त्यांच्या मोठेपणाच्या आठवणीही यमू सोनूला कधीं कधीं सांगत असे. त्यांच्याचपैकीं एकानं मोठं दयावंत होऊन यमूला अनाथ बालिकाश्रमाची वाट दाखविली आणि कृतकृत्य होऊन तो महाभाग वऱ्हाडप्रांतीं परत गेला. तेव्हांपासून यमू आपल्या दूरच्या गोतालाही अगदीं तुटली आणि तेव्हांपासूनच सोनूनं तिला आपलं गोत मानलं. सोनू हसायची, सोनू जवळच्या माणसांत बोलायची, पण यमू हसणं आणि बोलणं अगदीं पूर्णपणें विसरून गेली होती. सोनूसारखं यंत्राच्या शक्तीनं काम करणं तिला जमत नव्हतं, तिची प्रकृति सोनूइतकी निकोप नव्हती आणि तिचा चेहेरा कायमचा उदास होता. न संपणाऱ्या रात्रीच्या घटका मोजण्यांत आणि जें कधींही शक्य नाहीं त्याची आस धरण्यांत यमू चूर होती. सोनूचं हसणारं गांभीर्य सोनूच्या वडलांना समजलं नव्हतं पण

यमूचं रडणारं औदासीन्य मात्र त्यांना आवडलं होतं. म्हणूनच नोकरीच्या गांवीं यमू आणि सोनू एकत्र राहाणार ह्या कल्पनेनं त्यांना आनंद झाला होता. त्यांना वाटलं, आपली पोरगी शिकली, पंचवीस रुपयांची कां होईना, तिला नोकरी लागली, विधवाधर्म उत्तम प्रकारें ओळखणारी सोबतीण तिला लाभली, आतां आपलं तिच्या विषयींच उत्तरदायित्व संपलं! महागामोलाचे दिवस झाले, तरी त्या दोघींच्या पगारांत त्यांचं स्वतःचं, येवढंच नव्हे तर तात्याबनूचंही, बऱ्यापैकीं निभायला हरकत नाहीं!—आणि येवढं समाधान मानल्यावर आपल्या नापीक शेतींत आणि आधींच वाढलेल्या संसारांत, अण्णांनीं असं कांहीं डोकं खुपसलं कीं दक्षिण मराठा प्रांतांतील एका जुनाट जिल्ह्याच्या गांवीं आपली एक मुलगी सोनू, गेला दिवस बरा म्हणून जिणं काढत आहे, ह्याचंही त्यांना फारसं भान उरलं नाहीं!

  

"स्वतःच्या सुखदुःखाचं आणि स्वतःच्या जिण्याचं भान नसल्यासारखंच सोनूही आयुष्य घालवीत होती. तिच्या नोकरीचं दक्षिण मराठा प्रदेशांतील तें गांव म्हणजे एक जिवंत कब्रस्तान होतं. तिथलीं अर्धीं घरं जेमतेम उभीं होतीं आणि अर्धीं गाढवांचा अपुरा नांगर फिरल्याप्रमाणं कोसळत आलीं होतीं. तिथल्या प्रत्येक पेठेंतली घाण वेगळी होती. जुनाट वाडे, पडक्या भिंती आणि वस्तीवर जागोजाग चाल करणाऱ्या मोकळ्या बखळी, ह्यामुळें तें ऐतिहासिक काळीं भरभराटींत असलेलं गांव, आतां एखाद्या आजारी माणसासारखं दिसत होतं. प्रचंड घटनांचा पूर जुन्या काळीं त्या गांवावरून वाहून गेला, आणि आज मात्र तें गांव जीवनाच्या प्रवाहापासून तुटलेल्या हिरव्या डबक्याप्रमाणं संकुचितपणें फसफसत राहिलं. त्या अर्धमृत नगरींतल्या पौरजनांविषयीं विशेष काय सांगावं? जिथं हसावं तिथं रडतील, जिथं रडावं तिथं चिडतील आणि जिथं फुंकर घालावा तिथं डसतील, अशीं तिथलीं माणसं होतीं. त्यांच्या गलिच्छ नागमोडी वृत्तीला त्या गांवांतल्या दुर्गंधी गल्ल्यांचीच काय ती उपमा शोभण्यासारखी होती. सहा वर्षांपूर्वीं किडमिड्यांच्या अंधेऱ्या आणि ओलसर वाड्यांत ह्या दोन निराधार विधवांनीं अडीच रुपये मासिक भाड्यांत आपला भयाण संसार मांडला, तेव्हां आकाशांत

देवाला जें कांहीं वाटायचं तें वाटलं असेल, पण सोनूच्या नव्या ग्रामबंधूंना ती इतकी मौजेची गोष्ट वाटली कीं समोरच्या भिंतीवर खडूनं आपल्या भावना व्यक्त केल्याशिवाय त्यांना राहावलं नाहीं. ह्या सलामीला शोभेल अशीच संभावना त्या गांवांत गेलं अर्धं तप सोनू व यमू ह्यांना मिळत होती. मंगळवार पेठेंतल्या घरापासून मान वर न करतां मोटरस्टॅण्डजवळच्या कन्याशाळेंत जाणं व तेथून परत येणं हें त्यांच्या आयुष्यांतलं दैनिक दिव्य होतें. मान वर न करतांही आपल्या शरीरांत अनेक डोळ्यांच्या जहरी जोडगोळ्या शिरत असल्याची असह्य जाणीव त्यांना दररोज होई. अनाथ बायांची हेळणा किती करावी ह्याची पर्वा त्या बाया अनाथ आहेत हें माहीत असल्यावर कोण कशाला करील? गांवांत राहणाऱ्या मास्तरणी व नर्सेस ह्या आपल्या विशेष मस्करीसाठीं राखून ठेवलेल्या वस्तु आहेत, असा तेथील गुंड टोळक्यांचा विश्वास होता. पण गुंडांचीच गोष्ट कशाला? शाळा समितीच्या लघळ कार्यवाहाकडे पाहून कोणत्याही सुशील स्त्रीचा संताप झाला असता. नगरपालिकेच्या अध्यक्षाचे डोळे पाहातांच कोणतीही अनाथ विधवा कापूं लागली असती. आणि तरुण मास्तरणींचा दुस्वास फेंदारलेल्या नाकाच्या वयस्क हेडमास्तरणीनं करायचा नाहीं तर कोणी करायचा?

"कसं काय मास्तरीणकाकू?" म्हणून दांत विचकून सोनू–यमूची हालहवाल विचारणारे घरमालक शास्त्रीही तसे कांहीं कमी नव्हते. उकिरड्याला राजवाड्याची किंमत देणाऱ्या लढाईच्या दिवसांतही जुन्या भांड्यांत ह्या मास्तरणींना आपण राहूं देत आहोंत, हा आपल्या रसिकपणाचा भाग आहे, ह्या कल्पनेनं त्यांनाही गुदगुल्या होत असत.

सोनूला सारं कांहीं समजत होतं. लहान असती, तर दाद मागण्यासाठीं रडत ती आपल्या आईकडे गेली असती. पण आतां तिची आईही जिवंत नव्हती. तिच्या अण्णांकडे तिनं दाद मागण्याऐवजीं, आपल्या प्रकृतीचीं आणि गरिबीचीं गाऱ्हाणीं उलट तेच तिला सटीसहामाशीं पत्र टाकून ऐकवीत असत. सोनू रडत नव्हती. सहजासहजीं रडणं मुळीं तिच्या स्वभावांतच नव्हतं. काम, शिकवण्या, शाळा, वह्या आणखी काम आणखी शिकवण्या–! आयुष्याच्या चक्रावर सोनू सावकाश मोडली जात होती. ह्यांतून कुठं मार्ग नव्हता

आणि जो मार्ग होता त्यानं सोनू किंवा यमू ह्यापैकीं कुणीही गेलं नसतं. इतर वाटांचा विचार यमू पुष्कळदा करीत असे. तिनं पुण्याला नव्या कल्पना ऐकल्या होत्या. सोनूच्याही कानावरून त्या गोष्टी गेल्या होत्या, पण मनांत शिरल्या नव्हत्या. डोळ्याला फडकं बांधून सोनू घाणा ओढीत होती आणि यमू चक्राचे फेरे मोजून दुःख करीत होती. धरणीवर पडेपर्यंत सोनू असाच घाणा ओढणार होती आणि यमू असंच दुःख करणार होती.

दोन वर्षांपूर्वी लढाई सुरू झाली, महागाई वाढली, तात्या आणि बनूनं इंग्रजी प्रायमर हातांत धरलं आणि सोनूच्या कामाचं चाक अधिकच वेगानं फिरूं लागलं. यमू जास्त जास्त गडद होत जाणाऱ्या औदासीन्यानं आणि जास्त शिथिल पडणाऱ्या गात्रांनीं तो देखावा पाहात होती व म्हणत होती,

" सोनूताई ! जरा प्रकृतीकडे तरी पहा ! "

" काय धाड होणार आहे ग माझ्या प्रकृतीला ! कामानं कां कुठं माणसं मरतात ? " सोनू उत्तर देत होती.

आणि मग एक दिवस शाळा सुटल्यावर सायंकाळच्या दोन शिकवण्या आटपून सोनू घरीं परत आली, चुलीपुढें बसलेल्या यमूकडे पाहून ती कसली तरी व्यथा झाल्यासारखं हसली आणि स्वतःला नकळत बोटांच्या चिमटींत तिनं आपल्या भुवयांच्या मधला भाग दाबून धरला. सोनूचा चेहेरा पाहतांच परातींत हात धुऊन यमू उठली आणि तिनं सोनूला विचारलं,

" ताई, कपाळ दुखतं आहे तुझं ? "

एखाद्या गुन्हेगाराच्या घाईनं कपाळावरचा हात काढून घेत सोनू म्हणाली,

" छेः ग ! "

" कपाळावर हात कां ठेवलास मग ? "

" आपण कपाळावर हात ठेवायचा नाहीं तर कुणीं ठेवायचा यमे ! " सोनूनं हसण्याचा प्रयत्न केला. ती हसली सुद्धा. पण तें एखाद्या घायाळ माणसाचं

हसणं होतं. तिच्या कानशिलावरची शीर ताठ झाली होती, तिचं डोकं गरम पडलं होतं आणि तिच्या चेहेऱ्यावर व्यथेचं जाळं पसरलं होतं.

" मोठ्या बाई कांहीं बोलल्या ? "

" नाहीं ग ! "

" रस्त्यांत कांहीं झालं ? "

" नाहीं ! "

" घरमालक भेटले होते ? "

" रोजच्याच आहेत यमे ह्या गोष्टी ! "

—खरंच ! ह्या रोजच्याच गोष्टी होत्या ! नवा मनस्ताप होण्यासारखं त्यांत कांहीं नव्हतं. ह्या गोष्टी सहन करण्यासाठींच सोनूनं आपल्या मनाचा इतक्या वर्षांच्या तपश्चर्येनं दगड बनवला होता. काय वाटेल तें असलं, तरी आजपर्यंत सोनूची प्रकृति एखाद्या पोलादाच्या तुकड्यासारखी खणखणीत राहिली होती. मग आजच हा भयंकर मस्तकशूळ कुठून उठला ? डोक्यांत वजनदार घणांचा संथ मार कां सुरू झाला ? कानशील कां तापलं ?—कां तापली ? कणखर शरीर आणि कणखर मन ह्यांनीं एकमेकांचा तोल आजपर्यंत बरोबर सांभाळला होता, तो आजच कां बिघडला ? सोनूला स्वतःची लाज वाटली. मेंथॉलचा दर्प येणारा यमूचा हात तिनं निश्चयानं बाजूला सारला आणि ती म्हणाली, " थांब यमे ! दुखणं दिवा पाहून येतं, नि केरसुणी पाहून जातं ! येवढं काय करतेस त्याचं ? थांबेल उद्यां ! "

—पण दुसरा दिवस उजाडला, दुसरा आठवडा उजाडला, दुसरं वर्ष उजाडलं, तरी सोनूची व्यथा कायमच होती. बोथट नांगीच्या म्हाताऱ्या इंगळीनं डंख मारावा तशा वेदना ! बर्फ आणि विस्तव ह्यांचे क्रमानं बसणारे वाढते चटके ! नुसती मनाची मुकी व्यथा नाहीं, तर शरीराचीही ! पोलादाचं कवच घालणारं मन आणि पोलादाची प्रकृति ठेवणारं शरीर ह्यांचा मेळ कुठं सुटला होता ईश्वर जाणे !

" डॉक्टरकडे चल ना सोनूताई ! "

" नको ग ! "

" अशानं कसं व्हायचं ? "

" कांहीं तरी अडलं आहे का कुठं ? "

—कुठेंच कांहीं अडलेलं नव्हतं ! धुणंपाणी, शाळा, शिकवण्या—! सोनू आपलं ओझं अजूनही अगदीं तसंच वाहात होती. आतां फक्त तिला आपलं कपाळ चिमटींत दाबून धरण्याची आणि घाईघाईनें आपला हात खालीं आणण्याची नवी संवय लागली होती ! एरवीं त्यांचं आयुष्य त्याच मळलेल्या वाटेनं रखडत होतं !

  

खोलीचं दार उघडल्याबरोबर पोस्टमननं कांहीं टाकलं का हें पाहाण्याचा यमूचा नुसता चाळा होता. उगीच जिवाला तेवढंच समाधान ! उगीच बाहेरच्या जगाशीं कसला तरी काल्पनिक संबंध जोडण्याचा प्रयत्न ! पण महिनोगणती जिथं त्यांची कुणी पत्रांनीं विचारपूस करत नव्हतं, तिथें प्रत्यक्ष कुणी कशाला त्यांच्याकडे येईल ? फारच झालं तर गणपतीचं चित्र असलेली एखादी गुलाबी लग्न-पत्रिका दाराच्या फटींतून आंत भिरकावलेली त्यांना दिसे आणि ती पाहून यमू जास्तच हसूं लागे ! अण्णांच्या तक्रारवजा पत्रांखेरीज बाहेरच्या जगाशीं गेल्या सहा वर्षांत त्यांचा कसलाच संबंध उरला नव्हता !

" आणि मग एका सायंकाळीं एखाद्या कोंदटलेल्या खोलींत वाऱ्याचा स्वच्छ झोत शिरावा तसा, शीळ घालत आणि मनमुराद बोलत राजा त्यांच्या दारांत येऊन उभा राहिला !

" मास्तरीण काकू, कुणी पाहुणे सामान ठेवून गेले आहेत. " म्हणून नळावर सायंस्नान करीत असलेले घरमालक किंकाळले, तेव्हां यमूचं हृदय क्षणभर " धप्प " करून थांबलं. खोलीचं कुलूप काढण्याऐवजीं " पाहुणे ? " असं प्रश्नार्थक म्हणत ती घरमालकांच्या ओसरीकडे पळाली आणि तिनं तिथं ठेवलेल्या सूटकेसवरचं नांव वाचलं—**राजा बर्वे, नागपूर.**

" असा अकस्मात् इथं कसा आला राजा ? " म्हणून यमू मनाला प्रश्न करीत होती, तेवढ्यांत पंचा आटपत मिस्किलपणें किडमिडेशास्त्री पुन्हा नळावरून

ओरडले, "आत्तां फिरून येतों म्हणून सांगून गेले आहेत. तुमचे सख्खे चुलतभाऊ आहेत म्हणे ?"

किडमिड्यांना उत्तर देण्याचा भानगडींत यमू पडली नाहीं. इतकीं वर्षं मेलेल्या माणसाचाही पडूं नये असा आपला विसर आपल्या नातलगांना पडल्याचं दुःख वाटण्याऐवजीं, आज आपला भाऊ इतक्या वर्षांनीं आपल्याला भेटणार आहे, आपण कांहीं अगदींच अनाथ नसल्याचं आज इथल्या ह्या सर्व लोकांना दिसणार आहे, ह्या कल्पनेमुळं तिला आनंदाचा उमाळा आला आणि तिच्या आठवणींतल्या गजबजलेल्या माहेरच्या स्मृतींमुळं टिपं गाळीत ती चुलींतून धुमसणाऱ्या धुराकडे पाहात बसली.

—एकूणतीस—तीस-हो-येवढंच ! माझ्यापेक्षां वर्ष दोन वर्षांनीं मोठा ! तेव्हां राजा सोळा वर्षांचा, मॅट्रिकमध्यें शिकणारा, दाट आणि कुरळ्या केसांचा, गोरापान मुलगा होता ! भयंकर हंसरा आणि भयंकर बोलका ! आतां तो मोठा उमदा पुरुष दिसत असेल ! लग्न झालं असेल नाहीं त्याचं ? लग्न !

"यमू लाकूड सारण्यासाठीं चुलीपुढं वाकली आणि तिचे अश्रु जळत्या लाकडावर पडून चर्रर असा आवाज झाला. यमूचं मन विचार करत होतं. आणि अंतर्मन दाराकडे लागलं होतं. दार वाजलं, यमू झटकन् बाहेरच्या खोलींत गेली. आणि सोनू तिला चपला काढतांना दिसली, तेव्हां तिची क्षणभर निराशा झाल्याशिवाय राहिली नाहीं. मग पुन्हा तिला आनंदाचा उमाळा आला आणि ती म्हणाली—

"सोनूताई-सोनूताई—"

सोनूच्या कानशिलांवरची शीर तशीच ताठ दिसत होती. तिच्या थकलेल्या चेहेऱ्यावर तीव्र व्यथेचीं चिन्हं होतीं आणि तरीही ती हसण्याचा तसाच प्रयत्न करीत होती. दमलेल्या स्वरांत सोनूनं विचारलं, "काय ग यमूताई ?"

"आज आपल्याकडे पाहुणा आला आहे एक ! खरंच ! राजा ... माझा चुलत भाऊ."

“ आणि कुठं आहेत ते ? ”

“ मी शाळेंत असतांना आला. कुठं बाहेर गेला आहे सामान ठेवून. आत्तां परत येईल. ”

“ मग सामान कुठं आहे त्यांचं ? आणि हें पाहा, दूध आहे ना घरांत ? पाणी ठेवलंस का चुलीवर ? ”

यमूनं सोनूकडे ओथंबलेल्या दृष्टीनं पाहिलं. सोनूचा व्याकुळ चेहेरा तिला किंचित निवळत असलेला दिसला. भावासाठीं स्वतःला न सुचलेल्या गोष्टी सोनूनं आपल्याला सुचवल्या आणि आपण मात्र आज तिच्या डोकेंदुखीची चौकशी केली नाहीं ह्याची यमूला जाणीव झाली आणि ओशाळून तिनं सोनूला विचारलं,

“ सोनूताई, डोकं कसं काय आहे आज तुझं ? ”

पण ह्या प्रश्नाचें उत्तर द्यायला सोनूला अवसर मिळाला नाहीं. हातांत सूटकेस आणि काखेंत होल्डऑल घेतलेल्या एका मजबूत आणि गोऱ्या तरुणानें यमूला म्हटलें, “ माझं पाऊल घरांत पडलं कीं सगळ्या रोगांचं पाऊल घराबाहेर पडलं पाहिजे ! नाहींतर औषधकंपनीचा प्रतिनिधि कशाला व्हायचं ? कुणाचं डोकं दुखतं आहे यमूताई ? ”

यमूनें सोनूकडे बोट दाखविलें. सोनूची दृष्टि भुईकडे होती. स्वतःचें वाक्य संपल्यावर तो तरुण स्वतःच खदखदून हसूं लागला तेव्हां सोनूनें चमकून वर पाहिलें. नाहीं... तिच्यासमोर उभ्या असलेल्या तरुणाच्या दृष्टींत कसलें किल्मिष नव्हतें. एखाद्या पोरासारखा त्याचा चेहेरा निर्मळ दिसत होता आणि एखाद्या पोराच्याच निष्कपट स्वरांत तो तिला विचारीत होता, “ होय ? तुमचं डोकं दुखतं आहे ? ”

त्याचें बोलणें अगदीं अकृत्रिम आणि सहज होतें. त्याचा अनौपचारिक मोकळेपणा जवळजवळ स्पर्शजन्य होता. आयुष्याविषयींच्या उत्साहानें तो इतका भरून ओसंडत होता कीं त्याचा तो उत्साह त्याच्या सतत बोलण्याच्या आणि हसण्याच्या रूपानें वाट शोधणें जणूं क्रमप्राप्त होतें. चपळ हालचालींनीं

तो सामान उलगडीत होता व कारंजाच्या उडणाऱ्या धारांप्रमाणें त्याचीं वाक्यें एकमेकांचा पाठलाग करीत जात होतीं.

त्या वाक्यांत प्रश्नांचीं उत्तरें होतीं, प्रश्न होते आणि राहून राहून दुथडीं वाहणारें हास्य होतें.

" मी होय ? इंटर झाल्यावरच बाबांच्या घरून पळालों. नाहीं पटलं ! "

मुक्तपणें हसणें. सारवलेल्या जमिनीवर चामड्याच्या पेटींतल्या स्वच्छ कपड्यांची चळत फेकली गेली.

" लग्न ? अग कशाचं ! कोण देतो घराबाहेर पडलेल्या उडाणटप्पूला मुलगी ? "

पेटींतला चकचकीत आरसा जमिनीवर उताणा पडला आणि त्यांत दांडीवरचीं लुगडीं, खोलीचें दारिद्र्य आणि सोनूचा चेहेरा तरंगूं लागला.

" औषधं विकीत फिरण्याचा धंदा ! हं,—लिहितोंही थोडंसं ! घ्या,—ही माझी तुम्हाला भेट..."

दोन नऊवारी पातळें सोनू आणि यमूच्या दिशेनें सरकावलीं गेलीं.

" पर्वतेश्वर ? अवश्य जाऊं ! हरतालिका गणेशचतुर्थी —सुट्टी ! तुम्हांला पुण्य, मला सहल ! "

पुस्तकें, प्रवासी कॅमेऱ्यानें काढलेलीं चित्रें आणि कपडे ह्यांचा आणखी पसारा !

" मुक्काम ? फक्त तीन दिवस ! मोटर प्रवासानें हाडांचा खुळखुळा झाला अगदीं ! "

यमू राजाशीं बोलत होती आणि सोनू नुसतें ऐकत होती. बेफिकीर आनंद ! राजाच्या झगझगीत सामानानें त्या गरीब विधवांच्या खोलीचा नूर एकदम बदलल्यासारखा झाला. त्याच्या बोलण्यांत कांहीं विशेष नव्हतं पण बोलण्याच्या पद्धतींत होतें. आणि तें हसणें ! सोनूच्या जुन्या हसण्याचे ते पडसाद होते. आतां ती तसें हसत नसे; आणि दुसऱ्या कोणाच्या देखत तर मुळींच नाहीं ! पण कोणाला तरी खूप हसतांना ती पाहात होती. सोनूचें कपाळ

गोंदलेलें होतें आणि आतां तिथें नकळत तिचा तळवा दाबला गेला. खालीं पडलेल्या आरशावरून राजाची दृष्टि फिरली आणि तो सोनूला म्हणाला,

"तुमचं कपाळ दुखतं आहे?" सोनूनें नकारार्थी मान हलवली आणि यमूनें होकारार्थी मान हलवली.

सोनूनें पुन्हा मानेनंच निश्चयाचा नकार दिला आणि यमू तिच्याकडे पाहात राहिली. राजा गोंधळला, हसला, एका विलायती सुगंधाच्या बाटलींतला फवारा त्यानें हवेंत उडवला आणि खांद्यावर टॅवेल टाकून न्हाणीघरचा रस्ता धरला. हवेंत सुगंध तरंगत राहिला. राजाचें सामान जमिनीवर पसरलेलें होतें. अर्धवट बंद झालेल्या पेटींतून कपड्यांच्या घड्या डोकावत होत्या. बर्वे कुटुंबाच्या एका जुन्या चित्राकडे पाहून यमूला पुन्हा रडें फुटलें. सोनू थोडा वेळ तशीच स्तब्ध राहिली. दुःखाचें चोज पुरवायची तिची संवय नव्हती. तिनें यमूच्या पाठीवरून एकदा हात फिरवला आणि मग ती झपाट्यानें राजाचें सामान आवरूं लागली. कुढणाऱ्या आणि मरगळलेल्या यमूची काळजी सोनूनें घ्यावी आणि तिनेंच तिचीं उरलेलीं कामें आटपावीं हा रिवाज ठरून गेला होता. आज तिनेंच राजाचे कपडे धुतले, तिनेंच स्वयंपाक केला, तिनेंच त्याचा बिछाना झटकून ठेवला आणि मग दमून भागून आपला देह एका चौघडीवर लोटला. सोनूनें भुईला पाठ टेकली तेव्हां सर्वत्र शांत झालें होतें आणि बाहेरच्या खालींतून राजाच्या प्रवासी फोनोवर संगीताचे सूर घुमत होते. ते सूर ऐकतां ऐकतांच सोनूला झोप लागली. झोपेंतही ते सूर तिच्या कानांत घुमत राहिले आणि वातावरणांत तुषार टाकणाऱ्या सुगंधाचीं अनेक कारंजीं तिनें हिरव्याचार स्वप्नभूमीवर उडतांना पाहिलीं. त्या साऱ्या कारंजांचीं तोंडें सोनूनें सायंकाळीं राजाजवळ पाहिलेल्या विलायती सुगंधाच्या कुपीसारखीं होतीं.

पहाटेच्या अंधुक प्रकाशांत सोनूनें डोळे उघडले तेव्हां खिडकींतून तिला जाईचा मांडव पूर्णपणें फुललेला दिसला. मांडवावर चिमण्यांचा किलबिलाट सुरू झाला होता. त्यांच्या नाजूक हालचालींच्या धक्क्यानेंही वेलीवरून रात्रीच्या पावसाचे थेंब खालीं टपटपत होते. अंतःस्फूर्त उल्हासानें सोनू आज उठून बसली. तिनें

मन आणि तिचें शरीर सारख्याच उल्हासानें जागें झालें. थकलेल्या शरीराला कठोर इच्छेच्या पराण्या लावून तें तिनें आज जागें केलें नव्हतें आणि कामाला जुंपलें नव्हतें. आज तिचें शरीर आणि मन, अगदीं स्वेच्छेनें आणि साथीनें जागें झालें. आज तिच्या तोंडांत ती कडवट चव नव्हती. झोपेनंतरही आज तिला गळल्यासारखें वाटत नव्हतें. जागें होतांक्षणींच मस्तकांत पडणाऱ्या ज्या घणाच्या मंद घावाचा पहिला प्रहार निमूटपणें सहन करायला तिचें अंतर्मन शिकलें होतें, तो प्रहार आज पडला नाहीं. संवय म्हणून उगीच एकदोनदा तिचा हात कपाळाकडे गेला, आणि त्या क्रियेची निरर्थकता लक्षांत येतांच परत खालीं आला. मूळच्या निकोप प्रकृतीची आज सोनूला केवढ्यातरी काळानंतर पुन्हा जाणीव झाली आणि आजची ओलसर सकाळ तिला कल्पनातीत प्रफुल्ल भासली. जाईच्या फुललेल्या मांडवाकडे पाहात असतां दूर निघून गेलेले कितीतरी रम्य उषःकाल तिला आतां आठवले.

सोनू उठून बाहेरच्या खोलींत आली तेव्हां राजाची पेटी पुन्हा उस्कटून पडलेली आणि रात्रीं लावलेला फोनो तसाच उघडा असलेला तिला दिसला. पुन्हा तिनें तो पसारा आवरला आणि राजाला उठवण्यासाठीं माळयावर जायला निघालेल्या यमूला ती म्हणाली, " त्यांना निजूं दे आणखी जरा वेळ. प्रवासाचा शीण आला असेल त्यांना. आज पुन्हा पर्वतेश्वराचा डोंगर चढायचा आहे. थांब, तंवर मी फराळाचं करतें. "

आणि असें म्हणून नेहमींच्या वेगानें काम आवरीत तिनें पर्वतेश्वराला जाण्याची सिद्धता म्हणून डबा तयार केला. आश्चर्याची गोष्ट होती, पण गेल्या दोन वर्षांत जें कधीं झालें नाहीं, तें रातोरात होऊन गेलें. कसलेंही औषधपाणी न करतां जादू झाल्यासारखा रात्रीच्या कांहीं तासांत तिचा मस्तकशूळ नाहींसा झाला. आज तिचा हात मस्तकाकडे जात नव्हता. कर्तव्याचा चाबूक उगारून शरीराला चालत ठेवण्याची आवश्यकता आज तिच्या मनाला वाटली नव्हती. त्या कष्टाच्या आनंदासाठीं आज तिनें स्वतःचें काम केलें, यमूच्या वांट्याचें काम केलें आणि कपबशीवर चमच्याचा ताल धरून आडव्या पाटावर शीळ घालीत बसलेल्या राजाला ती म्हणाली,

" स्नान करतां ना ? "

" डोकं कसं आहे तुमचं ? "

" थांबलं. "

" माझ्या गोळ्या न घेतांच ? "

" हं ! स्नानासाठीं पाणी उपसून ठेवलं आहे. "

" खरंच सोनूताई, मला कां नाहीं सांगितलंस ? "

" तुला त्यांनीं प्रत्येक गोष्ट सांगायचं ठरवलं तर जन्मभर त्यांना नुसतं बोलतच बसावं लागेल. आणखी त्यांना तर बोलायला नको ! "

राजा पुन्हा हसूं लागला. त्या अंधेऱ्या खोल्यांनीं इतकें बोलणें आणि हसणें कधीं पाहिलें नव्हतें. आयुष्याविषयीं इतकी जिज्ञासा आणि जिव्हाळा ठेवणारं त्या खोलींत कधीं कोणी आलें नव्हतें. एखाद्या खडकासारख्या दाटून बसलेल्या तिथल्या स्तब्धतेच्या आतां एका दिवसांत ठिकऱ्या उडून गेल्या. श्वास कोंडून बसलेलें तिथलें वातावरण आतां आकस्मिक चेतनेनें डोलूं लागलें. रुद्ध होऊन बसलेले प्रवाह, एकाएकीं खळाळत सुटले. सोनू स्वतः फारसें बोलत नव्हती आणि मुळींच हसत नव्हती. पण कोणाला तरी खूप बोलतांना आणि हसतांना ती पाहात होती. तिच्या चेहेऱ्यावर उमटलेल्या व्यथेचें जाळें आज साफ वितळून गेलें. आज तिच्या मस्तकांत विस्तव आणि बर्फ ह्यांचा खेळ सुरू झाला नव्हता. तापून धापा टाकीत चालणारें तिचें शरीरयंत्र आतां अगदीं शांतपणें आपल्या क्रिया करीत होतें. शाळा आणि घर ह्यांमधला तो गटारांनीं मर्यादित केलेला, खडी उकरलेला आणि उघड्या पडलेल्या नळाच्या पोलादी नसा दाखविणारा रस्ता अखंडपणें ती तुडवीत आली होती. ह्या रस्त्याच्या एका टोकाला तिचा सनातनी घरमालक होता, आणि दुसऱ्या टोंकाला नाक फेंदारलेली हेडमास्तरीण ! ह्याच रस्त्यावर तें कुटाळांनीं भरलेलें पानपट्टीचें दुकान होतें, ती गांवठी धोब्याची लॉंड्री होती आणि तो मोटारस्टँड होता ! ह्याच रस्त्याच्या वांकड्या वळणानें जाणाऱ्या भिंतीवरच्या पांढऱ्या-काळ्या अक्षरांचा धसका अजून, इतक्या वर्षांच्या संवयीनंतरही तिच्या मनांतून गेला नव्हता. कितीतरी युगानंतर तो रस्ता सोडून आज सोनू पर्वतेश्वराच्या मार्गाला लागली. त्या वैराण गांवाबाहेरच हिरवेंचार, मोकळें, पावसाळ्यानें धुतलेलें

जग तिला दिसलें. पर्वतेश्वराचा डोंगर चढतांना सोनूला आपल्या आरोग्याचा नवा प्रत्यय आला. चढणीवर यमू धापा टाकीत मागें रेंगाळत होती आणि सोनू जवळ जवळ राजाच्या पाठोपाठ चालत होती. डोंगरमाथ्यावरचा निरोगी वारा तिच्याभोवतीं धिंगाणा घालीत होता. सांचलेल्या पाण्यांतून राजाचीं आणि तिचीं प्रतिबिंबें सरकत जात होतीं. मोकळ्या हवेंतल्या व्यायामानें तापलेलें तिचें रक्त तिला गुदगुल्या करीत शरीरभर फिरत होतें. एका ओलसर दगडावर पाय घसरून मध्येंच सोनू मोठ्या हास्यास्पद रीतीनें खालीं पडली आणि तिचा पदर शेजारच्या कांटेरी झुडपांत अडकला तेव्हां राजानें मागें फिरून तिला हात दिला. संकोचानें सोनूचा जीव अगदीं गुदमरून गेला होता. पण राजाचें तिच्या संकोचाकडे लक्ष नव्हतं. त्या प्राथमिक स्वरूपाच्या विनोदामुळेंही तो हसूं लागला आणि त्याचें ते हसणें इतकें लागट होतें, कीं त्यामुळें यमू हसली आणि अखेर सोनूही हसूं लागली.

तीन दिवस जायला फारसा वेळ लागत नाहीं. सोनू आणि यमूचें आयुष्य दक्षिण मराठा प्रदेशांतल्या त्या गांवाशीं आणि तिथल्या लोकांशीं पूर्णपणें जखडलें गेलें होतें. पण गेले तीन दिवस त्यांना वाटलें कीं आपण ह्या जुनाट, कुबट, गांवचेच नाहीं ! राजानें पुष्कळ शहरें पाहिलीं होतीं, पुष्कळ आयुष्य पाहिलें होतें. त्या तीन दिवसांत तें सारें आयुष्य जणूं त्या जुनाट खोल्यांत येऊन गेलें. त्या तीन दिवसांपुरता तरी त्या खोल्यांचा त्या गांवाशीं आणि तिथल्या त्या जगाशीं संबंध सुटला. राजा तेथें असतांना रस्त्यावरच्या कुटाळ गुंडांकडे एका निर्भय तुच्छतेनें यमूनें पाहिलें होतें आणि मोठ्या बाईंचीं बोलणीं अगदीं त्रयस्थपणें तिनें ऐकलीं होतीं. रस्त्यालगतच्या भिंतीवर झालेली नवी नोंद पाहून तिरस्काराशिवाय तिला दुसरें कांहीं वाटलें नव्हतें. पण बऱ्याच वर्षांनंतर अकस्मात् उजाडलेले ते तीन दिवस संपले व निघण्याच्या आदल्या रात्रीं आपली लॉरींतली जागा ठरवून राजा परत घरीं आला. परत आला, तेव्हां तो कमी हसत होता आणि जास्त गंभीरपणें बोलत होता. " यमे... " तो म्हणत होता, " विसाव्या शतकांत हें असलं गांव नि हें असलं... ! आम्हांला तर वाटत होतें कीं कर्व्यांच्या आणि आगरकरांच्या सुधारणा आतां अगदीं हास्यास्पद वाटण्याइतक्या जुन्या झाल्या आहेत. मुंबईपुण्याच्या मुली..."

राजा मध्येंच थांबला. यमूच्या डोळ्यांत सावल्यांची उत्सुक धावपळ चालली होती. राजा पुढें काय म्हणतो तें तिला ऐकायचें होतें. सोनूनें भुईकडे कठोरपणें टक लावला होता. दीर्घ तपश्चर्येनंतर पडाव्या, तशा तिच्या एके काळच्या कोवळया चेहेऱ्यावर रेषा पडल्या होत्या. राजाला पुढचे शब्द सापडण्यापूर्वीच सोनू कठिण स्वरांत यमूला म्हणाली, " यमूताई, घड्याळांत पहाटेचा गजर लावून ठेव. "

जें बोलायचें होतें, तें सांगायला राजाला आतां शब्द सापडेनात. कांपऱ्या आवाजांत त्यानें कशीतरी पुन्हा सुरुवात केली,

" हें पाहा, माझं ऐका. असलं हें आयुष्य...त्यापेक्षां..."

राजाच्या अडखळणाऱ्या वाक्याची तड लागण्यापूर्वीच अतिशय दृढ स्वरांत सोनू पुन्हा म्हणाली– " यमूताई, घड्याळ आण आणि गजर लाव ! " सोनूचा तो स्वर ऐकतांच राजा एकदम थांबला. त्यानें आळीपाळीनें सोनूकडे पाहिलें, यमूकडे पाहिलें, पुन्हा सोनूकडे पाहिलें आणि नंतर एक अक्षरही न बोलतां शीळ घालीत तो माळ्याचा जिना चढूं लागला.

दुसऱ्या दिवशीं अगदीं सकाळीं रस्त्यावर मोटारचा कर्णा लागोपाठ वाजूं लागला आणि " किन्नरा "च्या पंचमांतल्या हांका ऐकूं आल्या. राजाचें सामान बांधून तयार होतें. त्यानें नुकतेंच स्नान केलें होतें, चहा घेतला होता, आणि त्याच्या कपड्यांवरील सुगंधाचा मंद दरवळ चोहींकडे वावरत होता.

लॉरीच्या दरवाजावर कोपर व चाकावर पाय टेकून राजा यमू व सोनूचा निरोप घेत होता. यमूचे ओठ कांपत होते...डोळ्यांत आसवें जमा झालीं होतीं. सोनूचा चेहेरा मात्र एखाद्या धातूच्या मूर्तीप्रमाणें स्थिर आणि निर्विकार होता.

मोटारच्या छपरावर राजाचें सामान नीट रचलें गेलें आणि समोरच्या जागेवर बसून दार लावून घेत खालीं रस्त्यावर उभ्या असलेल्या त्या दोघींना तो म्हणाला,

" बरं आहे. येतों आम्ही. "

" पत्र पाठव बंर का. "

" अवश्य. "

" आणखी पुन्हा ये. "

" आतां तुमची पाळी. " असें म्हणून राजा जोरजोरानें हसला. मोटारचें एंजिन सुरू झालें, कर्णा पुन्हा वाजला, चाकें मागं पुढें झालीं आणि " सूंय्...भर्रर्र..." असा आवाज करून धुराच्या आणि धुळीच्या लोटांत गाडी सुरू झाली.

राजाच्या निरोपादाखल हलणाऱ्या हाताकडे त्या दोघीही कांहीं क्षण अनिमिषपणें पाहात होत्या. मग समोरच्या वळणावर गाडी जातांच पुन्हा थोडा धूर उसळला, पुन्हा थोडी धूळ उडाली आणि नंतर खिडकींतून हलणारा तो राजाचा हात आणि ती लॉरी एकदमच दिसेनाशीं झालीं.

पदरानें डोळे पुसत आतां कोठें यमूनें सोनूकडे पाहिलं. सोनूचे डोळे मिटलेले होते, तोंड आजारी दिसत होतें आणि तिनें आपला तळवा कपाळावर घट्ट दाबून धरला होता. सोनूचा तो चेहेरा पाहून घाबरलेल्या स्वरांत यमूनें विचारलें,

" सोनूताई, काय ग होतं आहे ?" सोनूनें कपाळावरचा पंजा खालीं आणला, डोळ्यांची उघडझांप केली आणि ओढलेल्या स्वरांत ती म्हणाली, " कांहीं नाहीं यमूताई. थोडंसं डोकं दुखतं आहे ! "

# पुनर्जन्म !

ज्या धंदेवाईक कलावंतांच्या ( Commercial Artists ) कलेंत धंदा नसतो, धंद्यांत कला नसते, नशिबांत यश नसतें आणि पोटांत पुरेसें अन्न नसतें, आणि पहिल्या मजल्यावरून तळमजल्याच्या शेवटच्या पायरीपर्यंत डोकें आदळत गडगडत गेल्यामुळें ' मोनोफ्रेजिया ' नांवाच्या कठिण विकाराची बाधा होऊन ज्यांचा उजवा हात बधिर व बेकाम होतो, त्या व्यापारी चित्रकारांचें वर्तन आणि निर्णय सामान्यतः ' गणू शिंदे, कमर्शिअल आर्टिस्ट ' ह्याच्या वळणावर जातात.

गिरगांव रस्त्यालगत असलेल्या गाजरवाडी गल्लींतल्या एका विशेष गलिच्छ व गगनचुंबी इमारतीच्या कलत्या छपराखालील खुराड्यांत गणू शिंदे विचित्र चेष्टा करीत आणि स्वतःचे शब्द स्वतःला ऐकवीत बसला होता.

" मला मेलं पाहिजे. . ." गणू शिंदे कोरड्या आणि घोगऱ्या आवाजांत आवंढा गिळून म्हणत होता, " मला तत्काळ मेलं पाहिजे ! "

परलोकाच्या प्रवासाला निघण्यापूर्वीं इहलोकीं जी तयारी व्हावी लागते ती आतां गणूनें पुरी करीत आणली होती. त्याची बायको सारजा दीड वर्षापूर्वीच त्याचा आणि त्याच्या दरिद्री संसाराचा निरोप घेऊन स्वर्गवासी झाली होती. त्या वेळीं तिच्या पोटीं जें पहिलें मूल आलें तेंच मुळीं दुसऱ्या लोकाकडे दृष्टि ठेवून आणि दोन जणांच्या परत प्रवासाची चिठ्ठी घेऊन जन्मास आलें होतें.

सारजेवर गणूचें प्रेम होतें. खरेंच सांगायचें तर सारजेचा गणूला अतिशय उपयोग आणि आसरा होता आणि हें गणूला माहीत होतें. सारजा त्याची बायको होती, स्वयंपाकीण होती, मोलकरीण होती, सोबतीण होती, आई होती आणि दाई होती ! ' गणू , तूं मोठा मूर्ख माणूस बुवा ' ह्या अलबत्या गलबत्यांनीं आपुलकीच्या सलगीनें केलेल्या अहेराच्या ठेंचा खाऊन अपेशी गणू घरीं परत आला कीं सारजा तो महापंडित असल्याविषयीं त्याची क्षणार्धांत निश्चिति पटवून देई ! अंगांत घालायला आज चांगलासा सदरा नाहीं, ह्या जाणिवेमुळें गणू जेव्हां कावराबावरा होई, तेव्हां सारजा त्याच्यांपुढें त्यानेंच केव्हां तरी

रद्दींत फेकून दिलेला सद्रा कुशल डागडुजीच्या अनोळखी स्वरूपांत आणून ठेवी. आज गणू उपाशी होता. पण सारजेचा संसार म्हणजे अन्नपूर्णेचें राज्य होतें. चलतीच्या चार दिवसांत ती कोठें काय जपून ठेवीत असे देव जाणे, पण तिच्या राज्यांत त्याला कधीं उपास पडला नाहीं, कीं त्याचे कपडे कधीं घामट राहिले नाहींत. आईबापाच्या मायाछत्राखालीं उन्हाचे सारे कडक कवडसेही कसे टिपले जात असतील ह्याचा अनुभव पोरक्या गणूला सारजेच्या भोळ्या आणि भाविक प्रेमानें आणून दिला. नेहमीं अपेक्षाच्या मार्गावर असलेल्या गणूला बाहेरच्या जगांत कसें घाबरल्यासारखें होई. एखाद्या रागीट मास्तरानें कोणा मद्दड मुलावर छडी उगारावी, तशी साऱ्या जगानें डोळे वटारून आपल्यावर कायमची छडी उगारली आहे, अशी त्याची जगाविषयीं धारणा झाली होती. गणू घराबाहेर निघाला कीं चाचरत बोले आणि घाबरत चाले व त्यामुळें तो लोकांना होता त्यापेक्षां किती तरी अधिक मूर्ख वाटत असे. त्याचा आत्मविश्वास कोणामुळें फुलत असेल तर सारजेमुळें आणि सारजेसमोर! 'तुम्ही कीं नाहीं अगदीं खुळे आहांत' असें ती मुद्दा त्याला कधीं म्हणे आणि नंतर अतिप्रसंगाच्या कल्पनेमुळें सारजा जी मान खालीं घाली, ती पक्कीं पांच मिनिटें! चालू वजनामापाप्रमाणें गणूची बुद्धि बरीच उणी भरत असली, तरी चेष्टा करण्यासाठीं केलेल्या प्रेमाच्या गुदगुल्या आणि रक्त आणण्यासाठीं घेतलेले ओरबाडे ह्यांतील भेद कळण्याइतकी ती शाबूत होती. सारजेच्या परिहासामुळें आणि तिच्या त्या मान खालीं घालण्या-मुळें गणू नुसता तरारून जाई आणि तिच्या अंगावरचें विटकें वस्त्र पाहातांच स्वतःच्या नाकर्तेपणाच्या जाणिवेमुळें त्याच्या पोटांत तुटूं लागे! पण सारजेचें वैवाहिक आयुष्य विटकीं लुगडीं नेसून खुद् खुद् हसण्यांत आणि गणूचें तिच्या-कडून सेवा करून घेण्यांतच संपून गेलें! सारजेला दिवस राहिले असतां लग्नाच्या वेळचें ठेवणींतलें टोपपदराचें लुगडें नेसून तिनें गणूबरोबर सिनेमा पाहिला आणि सँडहर्स्ट पुलावरच्या एका सस्त्या फोटोग्राफरकडून फोटो काढून घेतला, तोच त्यांच्या आयुष्यांतला उत्सव प्रसंग! टपोऱ्या डोळ्यांच्या, ठळक कुंकवाच्या, डोईवरून पदर घेतलेल्या काळ्यासांवळ्या सारजेचा तो फोटो अजूनही भिंतीवरून गणूच्या जीवनाकडे केविलवाणी टक लावीत होता. सारजा गेली

आणि तिची ही कागदावरची सावली तिच्या संसाराच्या स्मशानांत रेंगाळत राहिली. घेतां येईल तेवढी चाकरी घेतल्यावर गणूनें सारजेच्या पोटीं एक यमदूत पाठवून तिच्या उपकारांची फेड केली.

होय, गणूलाही तसेंच वाटत होतें. सारजा चौदा तासांत तडकाफडकीं वारली. मरतांना सुद्धा तिनें त्याचीच चिंता केली. जिवाभावासाठीं जपून ठेवलेले पंचवीस रुपये तिनें त्याला दाखवले आणि शेवटचा श्वास घेत ती मंद स्वरांत म्हणाली, ' मी जातें, आपल्या जिवाला जपा ! '

आणि आतां आज, सारजेच्या मृत्यूनंतर दीड वर्षानें एका चंद्रमौळी टेबलावर कपाळ टेकून जिवावर उदार झालेला गणू स्वतःला सांगत होता, ' मला मेलं पाहिजे, अगदीं लवकर मेलं पाहिजे ! '

सारजेच्या मरणानें गणूला धक्का बसला, पण त्या आघातापोटीं त्यानें प्राण पणाला लावले नाहींत. सारजा गेल्यामुळें त्याच्या जीवनाचें तंत्र पार बिघडलें, त्याची प्रकृति अर्ध्यावर आली, ' सर्प छाप ' पॉलिशच्या लेबलासाठीं गांडूळ काढून ठेवल्यामुळें त्याच्या मूर्खपणाचा लौकिक अधिकच वाढला आणि त्याचें जेमतेम उत्पन्न अधिकच घटलें. खाणावळीच्या अन्नामुळें त्याला अपचनाचा विकार जडला आणि चारचौघांत बोलतांना तो जास्तच बावरूं लागला, हें सर्व खरें असलें तरी कशासाठीं कोण जाणे, पण जीव वांचविण्याची बनेल ती धडपड त्यानें आपल्याकडून केली होती. मोठ्या कष्टानें सारजेनें एकेक वस्तु जोडून आपला संसार मांडला होता. तो तिचा संसारच गेले चार महिने गणू मोडून खात होता. गंभीरपणें डोकें हलवून ' मोनोफ्लेजिया — मेंदूतील मोटार एरिआला धक्का लागला आहे—' असें आपल्या उजव्या हाताच्या बधिरतेचें कारण सांगणाऱ्या डॉक्टरी इलाजांसाठीं गणूनें सारजेचें किडूकमिडूक आणि भांडींकुंडीं ह्यांची वासलात लावली होती. दिवस गेले, आठवडे गेले, महिने गेले आणि आतां गणूची खोली अगदीं स्वच्छ झाली. तेथें कशाची अडगळ म्हणून उरली नाहीं. घरांतील रद्दी, टिनचे डबे, रिकाम्या बाटल्या, ह्यांच्या जोरावर अखेरच्या कांहीं दिवसांचें भोजन पैदा केल्यावर आपला कुत्र्याच्या कापलेल्या शेपटीप्रमाणें थरथरणारा हात वैद्यकीय दृष्टीसमोर धरून दुभंगणाऱ्या हृदयानें त्यानें त्या धन्वंतऱ्याचा अखेरचा निर्णय ऐकला—

" Residual Paralysis. हें आतां असंच राहायचं ! " ते शब्द ऐकतांच सारजेच्या आठवणी गणूच्या हृदयांत कधीं आल्या नव्हत्या अशा आवेगानें उचंबळून आल्या आणि तो एखाद्या जखमी जनावराप्रमाणें कण्हला. त्याच्या आवडत्या सरूच्या मृत्यूला न जुमानतां जिवंत राहिलेली त्याची जीवनावरील पकड आतां एकदम ढिली पडली. त्याच्या सारजेची केव्हांच मूठभर राख झाली होती. त्याचें घर धुऊन निघालें होतें. त्याला भविष्यकाळ उरला नव्हता. त्याचा उजवा हात अचेतन पडला होता. त्याचा उजवा हात ह्यापुढें केव्हांच चित्रें काढणार नव्हता. कधीं मिळालें तरी त्याचा तो हात ह्यापुढें त्याला केव्हांच जेवण घालणार नव्हता. जगाचा निरोप घेण्यासाठीं सुद्धा त्याला आपला उजवा हात वर उचलणें शक्य नव्हतें. अगदीं एकदा सुद्धा नाहीं. कधींही नाहीं ! अरेरे ! त्याचा उजवा हात !

गणूची परलोकच्या प्रवासाची तयारी झपाट्यानें पुरी होत होती.

" मोनोफ्रेजिया ! Residual Paralysis ! " एका तड गेलेल्या तळहाता-एवढ्या मळक्या आरशासमोर डोळे वटारीत आणि तोंडें वेडींवाकडीं करीत गणू स्वतःशीं बडबडत होता. सारजेच्या मृत्यूमुळेंही त्याला जो विचार स्पष्टपणें सुचला नाहीं, त्या विचारापर्यंत तो आतां एका टप्प्यांत जाऊन पोहोंचला.

" मला मेलं पाहिजे ! अगदीं लवकर ! " गणू स्वतःला पुन्हा पुन्हा बजावीत होता. " जिन्यावरून पडलों तेव्हांच मेलों असतों तर ही यातायात तरी वांचली असती ! स्वर्गसोपान ! " हा शेवटचा शब्द त्यानें कोठेंतरी वाचला होता.

मरणें म्हणजे जगांतून तोंड काळें करून जाणें, ही गोष्ट खरी ; पण मरणाच्या निर्धाराचा आणि तोंडावरून काळ्या रंगानें माखलेला ब्रश फिरविण्याचा फारसा संबंध नसावा. परंतु आपल्या डागळलेल्या मेजासमोरच्या एका स्टुलावर बैठक मारून रंगाचा कुंचला सरसावून आणि तड गेलेला आरसा नीट समोर ओढून तो स्वतःचें तोंड काळें करून घेत होता.

सरूविषयीं आज त्यानें जितका विचार केला, तितका आणि तितक्या तीव्रतेनें त्यानें तिच्याविषयीं कधींही विचार केला नाहीं. ह्यापूर्वी ती मेलेली होती आणि कसाही असला, तरी तो जिवंत होता. तिचा संबंध मृतांच्या जगाशीं होता आणि त्याचें आयुष्य सजीवांच्या सृष्टीशीं गुंतलेलें होतें. ह्यापूर्वी त्यानें सरूची केलेली आठवण सजीवानें मृताविषयीं करावी तशी होती. त्याची दृष्टि अद्याप पुढें होती, ती कायमची मागें वळलेली नव्हती. स्वतःच्या आयुष्याचा विसर त्याला पडावा तसा पडला नव्हता म्हणून व्हावी तशी आणि व्हावी तितकी सरूची आठवण त्याला होत नव्हती. समजा, गणूला वाटलें, आपला धंदा बरा चालला असता किंवा निदान आपला हा उजवा हात तरी असा लाकडासारखा होऊन आपण अपंग झालों नसतों, तर आपण काय केलें असतें ? आपण पुन्हा लग्न...! छेः–छे ! सगळेच कांहीं ग्यानबा कंपोझिटरासारखे म्हातारपणीं आंधळे आणि मोताद होऊन आपल्या सोन्यासारख्या पोरी एका ना-मॅट्रिक, पोरक्या आणि तिसऱ्या दर्जाच्या चिताऱ्याकडे ढकलीत नाहींत! ग्यानबापूर्वी आपल्याला जितके मुलींचे बाप भेटले ते सारे आपल्या गरिबीला आणि त्याहीपेक्षां आपल्या विख्यात मूर्खपणाला तसेच डावलून पुढें गेले. गरीब असला तरी चालेल, पोरका असला तरी चालेल, पण मुलांत कांहीं तरी चलाखी पाहिजे; मुलगा एक वेळ बदमाश असावा पण मूर्ख नसावा; ह्याविषयीं त्या साऱ्या अनुभवी मंडळींचें एकमत होतें. पण हा झाला मुलींच्या बापांचा विचार! परंतु समजा, सारजेच्या मृत्यूनंतर आपल्याला एखादा ग्यानबासारखा मुलीचा गरजू बाप भेटला असता, किंवा एखादी मुलगीच भेटली असती; तर...!

गणूला आपल्या मनाची अधिक तपासणी करवेना. त्या खोलींत सर्वत्र सारजेच्या खुणा होत्या. फणी करंड्याच्या कोनाड्यापाशीं कुंकवाचे ठसे उमटलेले होते. स्वयंपाकाचा कोपरा काळा झाला होता. दीड वर्षापूर्वीचें गंध घेऊन देव तसेच विसावत होते. उशीच्या अभ्र्यावर तिनें हिरव्या दोऱ्यानें '**गणपतराव शिंदे**' हीं अक्षरें ढोबळ वळणानें भरलीं होतीं. दांतांत सुई धरलेली सरू आतां गणूच्या डोळ्यांसमोर मूर्तिमंत दिसूं लागली. त्याचा जिवंत जगाशीं संबंध संपुष्टांत आला होता. मृत्यूच्या एका नव्या जिव्हाळ्यानें तो

आतां सरूकडे पाहूं लागला. ह्या भोळ्या, प्रेमळ, सात्त्विक पोरीला आपण आजपर्यंत विसरलों होतों! तिची एकही खूण आपल्या डोळ्यांत नीटशी भरली नाहीं! मग आपण आजपर्यंत केलें तरी काय? स्वतःच्या धंद्याची काळजी केली! स्वतःच्या दुखण्याची काळजी केली! सरूचं किड्रुक-मिड्रुक स्वतःचं शरीर शाबूत राखण्यासाठीं मोडून खाल्लं! सरूबरोबर मरून जावं, निदान सरूसाठीं रोज पोटभर रडावं, असंही आपल्याला वाटलं नाहीं! अरेरे! किती स्वार्थी, कृतघ्न काळतोंडे आपण! आणि आपल्या स्वार्थी काळ्या तोंडाचा विचार मनांत येतांच गणूनें कुंचला घेऊन अक्षरशः आपलें तोंड रंगवून काढायला सुरुवात केली.

गेल्या कित्येक महिन्यांत गणूला रडायला आलें नव्हतें. आजही त्याला रडायला येत नव्हतें. दुःखाच्या आणि पश्चात्तापाच्या कोरड्या आगींत तो नुसता भाजला जात होता. पण त्याच्या डोळयांत पाण्याचा थेंबही नव्हता. आपण पोटभर रडावें असें त्याला खूप वाटत होतें आणि तरीही तो रडूं शकत नव्हता. ह्या कोरड्या आणि भयंकर वेदनांमुळें गणूच्या जिवाची काहिली झाली. कपाळावर मारण्यासाठीं त्यानें उजवा हात उचलण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा तो हात उचलला गेला नाहीं. त्या जड पडलेल्या हातावर त्याचा बिलकूल ताबा नव्हता. गणू हताशपणें कण्हला आणि डाव्या हाताची मूठ टेबलावर मारीत घोगरा आवाज चढवून तो ओरडला, 'लवकर–लवकर मेलं पाहिजे!' पण त्याचा आवाजही फारसा चढला नाहीं.

सावल्या थोड्या कलल्या. कोठें तरी दोनचे ठोके पडले. गणूनें डोकें वर उचललें. त्याला भयंकर भूक लागली होती. सारजेच्या स्वयंपाकाचा खोलींत दरवळ सुटला आहे असा त्याला भास झाला. वाफ निघणारें अन्न सारजा ओणव्यानें आपल्याला वाढीत आहे, असें त्याला वाटलें. तो झटक्यानें उठला आणि स्वयंपाकाच्या कोपऱ्यांत गेला. त्याचा उजवा हात त्याच्या बाजूला लुलेपणानें लोंबत होता. स्वयंपाकाच्या कोपऱ्यांत कांहींच नव्हतें. टिनचे डबे सुद्धा नव्हते. चिमणीचीं दोन तीन पिसें त्याच्या हालचालीनें तेथें उडूं लागलीं. गणूला चक्कर आल्यासारखें झालें.

पण आठवणींत तरंगणारी त्याची बुद्धि आतां पुन्हा अगदीं स्वच्छ झाली होती. मरूं इच्छिणाऱ्या माणसाला कशाला अन्न लागतें कोण जाणे, पण त्याला ह्या क्षणाला अन्न पाहिजे होतें. त्याच्या खोलींतल्या एका भिंतीवर सारजेचा फोटो होता. कोनाड्यांत देव होते. दुसऱ्या भिंतीशीं एक विटकें टेबल आणि स्टूल होतें, त्या टेबलावर रंग आणि कुंचले होते ; आणि भोकाचे एकजात पांच पैसे एखाद्या देवळासारखे त्यानें तेथें मांडून ठेवले होते. कांहीं फाटके कपडे, हिरव्या अक्षरांचा अभ्रा असलेली ती उशी, पाण्याचा माठ आणि कवडी किंमतीच्या इतर वस्तु – पण त्या खोलींत कोठें अन्न नव्हतें. गणू आठवूं लागला – बरोबर ! कॉलरवर, कोपरावर व बाहीवर फाटलेल्या त्याच्या त्या खिळयाला लटकावलेल्या कोटांत काल संध्याकाळीं खाऊन उरलेले बरेचसे फुटाणे होते. तीरासारखा गणू त्या कोटाकडे गेला. पुन्हा त्यानें आपला उजवा हात वापरण्याचा प्रयत्न केला, पुन्हा त्याचा तो प्रयत्न फसला ; पुन्हा तो दुःखानें कण्हला आणि ते फुटाणे टेबलावर पसरून पेंडी खाणाऱ्या गुरासारखा तो ते फुटाणे तोंड लावून खाऊं लागला. कोणताच हात वापरण्याची त्याची इच्छा नव्हती.

गणूला आतां अगदीं आक्रोश करून रडावेंसें वाटत होतें, पण तरीही त्याला रडूं येत नव्हतें. मध्येंच त्यानें सारजेच्या फोटोकडे वळून पाहिलें. तिचे टपोरे डोळे त्याच्याकडे केविलवाण्या नजरेनें पाहात होते व म्हणत होते, " असा काय बरं धीर सोडतां..."

गणू उठला, मोठ्या प्रयासानें त्यानें अंगांत तो खिळ्यावरचा कोट घातला, सारजेचा फोटो काढून खिशांत ठेवला, फुटक्या नशिबासारखे दिसणारे टेबलावरचे ते पांच पैसे उचलले आणि ढसढसां पाणी पीत निकडीनें तो स्वतःशीं म्हणाला, " मोनोप्लेजिया ! आतां जगण्यांत अर्थ नाहीं. मेंदूंतला मोटर..." 'मोटर' ह्या शब्दापाशीं थांबून ह्या अवस्थेंतही त्यानें त्या शब्दाचें कौतुक केलें व तो खोलीबाहेर जाण्यासाठीं दाराकडे वळला.

पण गणू एकदम खोलीबाहेर गेला नाहीं. त्याच्या खोलीसमोर असलेल्या इमल्यांतल्या खिडकींत एक तरुण बाई आपल्या नितळ मानेला पावडर

लावायला आणि केस विंचरायला येऊन उभी राहाते ह्या गोष्टीची नोंद स्वतःला न कळत त्यानें गेले कित्येक आठवडे ठेवली होती. ती बाई आतांही केस विंचरीत त्या खिडकींत उभी होती. गणूनें थबकून तिच्याकडे पाहिलें आणि आपल्या कृतीचा अर्थ क्षणार्धांत लक्षांत येऊन स्वतःच्या शरीराचा आणि स्वतःच्या मनाचा गणूच्या हृदयाला आतां पुरा पुरा वीट आला. ‘ कृतघ्नपणा ! मरतां मरतां कृतघ्नपणा !’ गणू रक्त येईपर्यंत दांतांखालीं ओठ दाबून म्हणाला, “ मला मेलें पाहिजे ... सरू मला मेलें पाहिजे ! ”

आणि मग तो धडधडा जिना उतरून खालीं गेला.

■ ■ ■

अंधेराचे ढीग दुभंगीत आणि प्रकाशाच्या पट्टयांनीं आजूबाजूची झाडी उजळीत नागपूर मेल सोसाट्यानें धावत होती. गणू शिंदे नागपूर मेल मधल्या तिसऱ्या वर्गाच्या एका पाळण्यांतच ह्यावेळीं अंग दुमडून कां पडला होता, ह्याला कांहीं विशेष कारण नव्हतें. नागपूर ऐवजीं त्याला पूना किंवा मद्रास गाडीही चालली असती. खरेंच सांगायचें तर खोलीवरून निघतांना कोणत्याही गाडींत बसण्याचा त्याचा विचार नव्हता. मुंबईच्या वाहनांवर आणि मुंबईच्या मारेकरी रहदारीवर त्याचा नितान्त विश्वास होता. थोडेंसें मनांत आणलें, किंवा थोडेंही मनांत नसलें तरी एखाद्या गर्दीच्या रस्त्यावर आपलें काम सहज होईल असें त्याला वाटत होतें. पण आज त्याचा हिशेब सपशेल चुकला. अपघातांच्या दैनिक वार्ता वाचल्यावरही ज्या अर्थी अनेक लक्ष लोक मुंबईत जिवंत राहातात, त्या अर्थी त्या नगरीची मारण्यापेक्षां जगविण्याची शक्ति जास्त मोठी असली पाहिजे, ह्याची त्याला आधींच कल्पना यायला पाहिजे होती.

आज गणू आपले प्राण अगदीं तळहातावर झेलीत निघाला होता. आंगणांत शतपावल्या कराव्या तशा त्यानें गिरगांव रस्त्यावरून धोबीतलावापर्यंत, रीगल चौकापासून फ्लोराफाउंटनपर्यंत आणि फ्लोराफाउंटनपासून बोरीबंदरपर्यंत अनेक शतपावल्या केल्या. त्यानें गच्च डोळे मिटून टेहेलत टेहेलत हॉर्न्बी रोड मोजून पन्नास वेळां ओलांडला. धावत्या मोटरला आडवें जाण्याचा त्यानें प्रयत्न केला. केळ्याच्या सालीवर त्यानें बेलाशक पाय दिले. पण अमरपट्टा

मिळाल्याप्रमाणें प्रत्येक वेळीं त्याचा जिव वांचला. त्याला पाहातांच भर वेगांतल्या मोटारी अशक्यप्राय असें आत्मसंयमन करून कैंकाटत त्याच्या शरीरापासून अर्ध्या इंचावर थांबूं लागल्या. तो दृष्टीला पडतांच धावते घोडे लगामाच्या खेचीमुळें दोन्ही पाय वर उचलून त्याला सुरक्षित सलामी देऊं लागले; आणि एरवीं प्रेताला औषध द्यायला धावणाऱ्या पोलिसांनीं तर आज ह्या तोंड काळें केलेल्या वेड्याला जीवदान व गचांड्या द्यायचा नुसता विडा उचलला. जीव जगवणें किती कठिण असतें ह्याचा गणूला चांगला अनुभव होता, पण जीव देणेंहीं कधीं कधीं किती बिकट होऊन बसतें ह्याचा तो आज अनुभव घेत होता. आयुष्याच्यातर्फे जाणाऱ्या ह्या साऱ्या अपघातांना कंटाळून अखेर गणूनें बोरीबंदरसमोर ऐन रस्त्यावर सपशेल लोळण घेतली. उलटसुलट बाजूनें चार दोन वाहनें गणूच्या अंगावरून जाण्याच्या अगदीं बेतांत होतीं, पण ह्याही खेपेस पोलिसानें त्याला अंतराय दिला नाहीं. एका अखंड ओळींतली दहावी गचांडी देत त्या पोलीस बहाद्दरानें त्याला विचारलें, " काय राव ? मरायचं असल जनूं ? का चलायचंयू चौकीवर ? "

गणूकडून 'भला मरायचं आहे' असें उत्तर मिळण्यापूर्वीच हातांतलें दांडकें आपटीत दुसऱ्या एका पोलिसानें पहिल्याला पुस्ती दिली, 'ठाण्याला पाठवा पावण्याना...ठाण्याला ! – ' आणि नंतर पहिल्या पोलिसानें गणूला अकरावी गचांडी देऊन बोरीबंदरच्या तिसऱ्या वर्गाच्या प्रतीक्षागृहापर्यंत धडपडत धाडलें. ठाण्याला किंवा चौकींत बंद होण्यांत कसलाच शहाणपणा नाहीं ही गोष्ट मनाशीं पटवून घेत गणू जमिनीवरून उठला आणि त्याला समोरच केव्हां तरी लावलेली रेल्वेची जाहिरात दिसली. " See India– काश्मीर, हिंदुस्थानचा स्वर्ग " आणि त्या खालींच त्याला दुसरी जाहिरात दिसली, " Travel only when you must and travel light."

त्या स्वर्गविषयक आणि आवश्यक तेवढ्याच हलक्या प्रवासाच्या जाहिरातींनीं गणूला एक नवी कल्पना दिली. 'अगदीं हलका प्रवास, आवश्यक तेवढाच आणि स्वर्गाचा !' गणू मनांत म्हणाला आणि तिकिटासाठीं ताटकळणाऱ्या रांगेची कींव करीत एक आण्याचा चहा पिऊन एका घोळक्याबरोबर तो तडक नागपूर मेलच्या प्लॅटफॉर्मवर घुसला. दारावरच्या एका अर्धांग्ल तिकिट

तपासनिसानें 'ए यू, किडर ज्याटा...' म्हणून म्हटल्याचें त्यानें ऐकलें व त्याला दुसऱ्याकडून मिळालेलें "Let go! The bird is off his bean" हें उत्तरही त्याच्या कानावर आलें.

जगाचे सामान्य कायदे गणूसारख्या वेड्यावर लादायला आज तो तिकिटमास्तरही तयार नव्हता. जगाला सोडून जाण्याचा निश्चय करणाऱ्या गणूच्या विषयांत आज जगानेंही आपले नियम सैल सोडले होते. आज त्याला प्रवासासाठीं पैशाची काळजी करावी लागली नाहीं, तिकिटाची काळजी करावी लागली नाहीं आणि जागेचीही काळजी करावी लागली नाहीं. गणू प्लॅटफार्मवर भटकत असतां नागपूर मेलचे डबे त्याच्या देखत तेथें ढकलले गेले आणि त्या हालत्या डब्यांत गणूनें इतकी बेगुमान उडी घेतली कीं डब्यांचा वेग कमी होण्याची वाट पाहात धावपळ करणारे इतर प्रवासी 'अरे अरे' करीत 'आ' वासून क्षणभर त्याच्याकडे पाहातच राहिले. ह्या नव्या धाडसाचें फळ सुद्धा गणूला अगदीं नको तें मिळालें. त्याला पाहिजे होता अपघात आणि मिळाली मात्र एका तिसऱ्या वर्गाच्या पाळण्यावरची जागा!

नागपूर मेल फुसांडत ठिणग्या फेकीत आणि शिट्या देत धावत होती. खिडकींतून बाहेर पडणाऱ्या उजेडाच्या कवडशांत गणूला झाडें, शेतें आणि नद्या भराभर मागें जातांना दिसत होतीं. त्याची पाळण्यावरची जागा गणूला पुष्कळच दृष्टींनीं सोईस्कर होती. तेथें त्याच्याकडे कोणाचें फारसें लक्ष वेधण्यासारखें नव्हतें... तिकीट तपासनिसाचें सुद्धा नाहीं.

रात्र उलटूं लागली आणि गाडींत बसलेले प्रवासी बसल्याबसल्या आणि उभे असलेले प्रवासी उभ्या उभ्या डुलक्या देऊं लागले म्हणजे मग खालीं उतरून एकदम चालत्या गाडींतून उडी घेण्याचा त्याचा बेत होता. त्यासाठीं फक्त पहाटेपर्यंत जागें राहाणें आवश्यक होतें आणि सर्व तऱ्हेच्या श्रमांमुळें गणूला तर आतां भयंकर झोप येऊं लागली होती. झोप आणि भूक हे वास्तविक जगणाऱ्या माणसांचे चोचले. दुपारीं त्याला भुकेनें भंडावलें आणि आतां भुकेची साथ करून झोप त्याला सतावीत होती. त्याच्या

पायथ्याशीं कोणीतरी रचून ठेवलेल्या आंब्याच्या करंड्यांतून पिकलेल्या फळांचा मधुर वास हवेंत मिसळून जात होता. पुरेशा न निवलेल्या छपराचे कोमट चटके अजूनही त्याला जाणवत होते. गाडीच्या प्रत्येक हादऱ्याबरोबर शरीर दुमडून पडलेल्या गणूला त्याच्या डोक्याशीं असलेल्या एका ट्रंकेचा कोपरा लागत होता आणि तरीही गणूला विलक्षण झोप येत होती. आतां लवकरच कायमची झोप घ्यायची असून अजूनही आपल्याला झोप येते अं ? असें म्हणून गणूनें आपले चुरचुरणारे डोळे खूप ताणले, अंग झटकलें आणि संतापानें उशालगतच्या ट्रंकेवर स्वतःचें डोकें आपटून घेतलें. आतां गणूच्या झोपेचा अम्मल कमी झाला आणि त्याचे ताठरलेले डोळे निरुपाय म्हणून डब्यांतील इतर प्रवाशांकडे पाहूं लागले.

गणूच्या अगदीं समोरच टिचकी मारली तर रक्त निघेल अशा कोवळ्या आणि रसरशीत वर्णाची एक पोरसवदा आई बसली होती. तिच्या छोट्या मुलाला गणूचें तोंड बरेंच कौतुकास्पद वाटत असलें पाहिजे. कारण तें पोर वारंवार बोट दाखवून आपल्या आईचें लक्ष गणूकडे वेधण्याचा प्रयत्न करीत होतें, आणि एक निसटता दृष्टिपात केल्यावर ती बाई पुन्हा गणूकडे पाहावयास राजी नव्हती. त्या बाईच्या उजव्या हाताला एका छोटेखानी टिनच्या ट्रंकेवर दोन माणसांची जागा अडवून संपत्तीवर बसलेल्या लठ्ठ नागाप्रमाणें एक कच्छी डोलत बसला होता. त्या टिनच्या ट्रंकेवरून आपलें बूड हलवायला किंवा ती ट्रंक खालीं ठेवायला तो बिलकूल सिद्ध नव्हता. ह्या मुद्द्यावर त्याची गाडीच्या प्रत्येक ठाण्यावर कुणाशीं तरी वादावादी व्हायची, हें ठरून गेलें होतें. त्या बाईच्या डाव्या हाताला कोराकरकरीत गोटा केलेला एक गंधधारी ब्राह्मण गुडघ्याभोवतीं उपरणें लपेटून पलीकडे बसलेल्या पिवळ्या पगडींतल्या मारवाड्याला धर्मग्लानीविषयीं व्याख्यान देत होता. त्या मारवाड्याच्या शेजारींच दाढींत तोंड लपलेला आणि हातापायांच्या हिरव्या नसा उघड्या पडलेला एक म्हातारा मुसलमान डुलक्या घेत होता. दोन बाकांच्या मध्यें घोंगड्या टाकून त्यांवर कांहीं भगव्या कफनींतले साधू बिनदिक्कत झोपले होते. मधल्या बाकांवर गणूकडे पाठ करून बसलेल्या प्रवाशांच्या

रांगेतल्या शेंडीच्या झुबक्यावरून, मलमलीच्या टोपीवरून किंवा कंगणीदार भांगावरून त्यांच्या प्रांतांविषयीं, जातींविषयीं आणि चेहेऱ्यांविषयीं अंदाज बांधणें शक्य होतें.

डब्याच्या अगदीं दूरच्या कोपऱ्यांत "संडास" अशी लाल पाटी सामानाच्या ढिगावरून डोकावत होती आणि डब्राभर भीक मागण्याची पूर्वतयारी म्हणून एक जोडपें तेथें तंबोरीच्या आणि घशाच्या तारा ताणून भजन म्हणत होते. दहा जणांच्या चालत्या तोंडांतून निघणाऱ्या गप्पांचा त्या डब्यांत एकच गोंगाट माजला होता आणि लढाई, महागाई, राजकारण व हवापाणी ह्या साऱ्यांचेच त्यांत पडसाद उमटत होते. आपल्या दूरदूरच्या मुक्कामावर मेल गाडी थांबली कीं जितके प्रवासी खालीं उतरत त्यापेक्षां कितीतरी अधिक प्रवासी आंत चढत. गणू जडावलेल्या नजरेनें त्या आगगाडींतल्या छोट्या जगाकडे पाहात होता व चिखलांतून सावकाश ओढल्या जाणाऱ्या बैलगाड्यांच्या रांगेप्रमाणें त्याच्या मस्तकांतून विचार सरकत होते.—ह्या डब्यांतल्या प्रत्येकाला अजून आयुष्याचा लोभ आहे. त्यांच्यापैकीं कुणाला तरी मरणाची आठवण आहे का ? कां म्हणून असेल ? त्या गोंडस मुलीचं पोर कितीतरी सुंदर आहे ! त्या शास्त्रीबुवांचं घरही गजबजलेलं असेल ! त्या कच्छी व्यापाऱ्याच्या ट्रंकेंत भरपूर पैसा असला पाहिजे ! आणि तो पलीकडचा बोलघेवडा मद्रासी कुठल्यातरी ऑफिसांत आनंदानें नोकरी करतो. ह्या साऱ्यांच्या दिशा ठरलेल्या आहेत. ह्या साऱ्यांना जगांत स्वतःची जागा आहे. आपला मुक्काम आला कीं प्रत्येकजण ह्या डब्यांतून खालीं उतरेल. हो, खालीं उतरेल आणि आपल्या आयुष्यक्रमांत गर्क होऊन जाईल. ह्या डब्यांत फक्त आपणच असे आहोंत कीं....

—कीं ज्याला जगांत जागा नाहीं !

—ज्याला भोवतालीं चाललेले सर्व व्यवहार निरर्थक वाटतात.

—ज्याची कुणी कुठें वाट पाहात नाहीं !

—ज्याला जगण्यापेक्षां मरण्यांतच सुख सापडेल !

—आपण मरूं. आणि हे सारे जगतील !

—आपण उद्यांचा सूर्य पाहाणार नाहीं.

आणि हे सर्व उद्यांचा सूर्य पाहातील!

तो "आ" वासून बसल्या बसल्या घोरणारा शास्त्री, तो त्याच्या खांद्यावर मस्तक ठेवून झोपलेला मारवाडी, तो नमाजाच्या पवित्र्यांत पुढें मागें झुकत जगाला विसरलेला रोडका मुसलमान, तो तक्षकासारखा टिनाच्या ट्रंकेवर राखण बसलेला कच्छी आणि आपल्या गोजिरवाण्या मुलाला पुढ्यांत सावरणारी ती सुंदर आई!—हे सारे पुन्हा उद्यां सकाळीं जागे होतील! आणि तेव्हां आपलें ठेचाळलेलें प्रेत जमिनीच्या कुठल्यातरी तुकड्यावर दुमडून पडलेलें असेल!

विचारांच्या तंद्रींतच गणूची दृष्टि समोरच्या त्या सुंदर मुलीकडे लागली. तिचें शरीर अगदीं टवटवीत होतें. तिचें सौंदय अगदीं सुरक्षित होतें आणि झोपेनें धुंदकारलेले तिचे डोळे अर्धवट मिटलेले होते. निद्रेच्या मखमली मायेंत गुरफटलेल्या तिच्या त्या डोळयांकडे गणू पाहात राहिला, झोपीं गेलेल्या इतर अनेक डोळयांची त्याला जाणीव झाली आणि मग विचारांच्या गुंगींत झोपेची गुंगी मिसळून गणूच्या पापण्या मिटूं लागल्या. आपल्या पापण्या मिटत आहेत, ह्याची जाणीव होतांच मोठ्या कष्टानें गणूनें डोळे ताणले व ते छपरांतल्या दिव्याकडे लावले. दिव्याभोवतीं शेकडों किडे उड्या घालीत होते आणि मरत होते. पुन्हा गणूची दृष्टि दिव्यावरून निसटून त्या पोरसवदा आईच्या अर्धोन्मीलित डोळयांवर लागली आणि ह्या खेपेस तिच्या अर्धोन्मीलित नजरेंतील झोप गणूच्या डोळयांना इतक्या झपाट्यानें लागली कीं त्यानें आंतल्या खिशांतला फोटो चाचपून सारजेचें नांव घेतलें, तेव्हां तो मुळींच शुद्धीवर नव्हता.

कांहीं तासांनंतर गणू जागा झाला तेव्हां त्याला वाटलें कीं "सारजा–रक्त!" म्हणून भयभीत स्वरांत आपण साऱ्या जगाला जागे करील अशी किंकाळी मारली. पण गणू ओरडला नव्हता. तें भयंकर स्वप्न पाहात असतांही गणू ओरडूं शकला नव्हता. आपल्या दांतांचा चक्काचूर झाला, आपले डोळे खोबणींतून बाहेर लोंबले, तोंडाला मुंग्या लागल्या व चेंचलेलें शरीर रक्ताच्या

थारोळयांत लोळत पडलें, असें स्वप्न गणूला पडलें होतें. आपल्या मरणाचा तो भयंकर देखावा पाहून " सारजा ! रक्त ! " म्हणून शक्तिसर्वस्वानें आपण ओरडत उठलों असें गणूला वाटलें. पण सर्व बळ खर्च केल्यासारखें वाटत असूनही गणू ओरडला नव्हता, तो फक्त पुटपुटला होता आणि आतां भयाच्या धक्क्यानें जागा होऊन सर्वांगानें तो कांपत होता.

भय–भय ! आक्रसलेलें, थरथरणारें, पांढरें फटक पडलेलें भय ! आपल्या मज्जाकेंद्रांतून निघणाऱ्या भयाच्या लाटांनीं डब्यांतील सारें वातावरण ग्रासून टाकलें आहे असें गणूला वाटत होतें. अजूनही स्वप्नांतल्या त्या भयाची गणूवर जबरदस्त पकड होती. घामानें तो डबडबला होता. त्याच्या तोंडाला कोरड पडली होती. ती अमानुष भीति झाडून टाकण्यासाठीं त्यानें धडपडून उठण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्या हातापायाला विलक्षण मुंग्या आल्या होत्या. एका अवर्णनीय अवसादानें त्याचें मन भरून गेलें होतें. सुन्न मनानें व अवघडलेल्या अंगानें तो जागींच खिळून राहिला व सर्वत्र लवलवणाऱ्या अनामिक भयाची तो विस्फारलेल्या डोळयांनीं प्रचीति घेऊं लागला. गणूला वाटत होतें कीं निश्चितपणें पेंगत पडलेली ही स्तब्धता आतां क्षणार्धांत विच्छिन्न होणार !

आणि खरोखरच पांच मिनिटांत तसें झालें ! भयानें घेरलेल्या गणूच्या मनानें दुसऱ्या कोठल्या अर्धनिद्रित मनाला पूर्वसूचना दिली कोणास ठाऊक, पण एक घोगरा व घाबरा आवाज आता निद्राजड स्वरांत पुन्हा पुन्हा ओरडून विचारूं लागला,

" केम भाई, सूं छे ? "

" अरे भाई, सूं छे ? "

ह्या साध्या प्रश्नांत व्याकुळतेचा इतका विलक्षण कंप होता, कीं गाफील व सुस्तावलेलीं मनें त्यामुळें खडबडून जागीं झालीं व कसल्यातरी अज्ञात व संसर्गजन्य कारणानें एकाएकीं भीतीच्या आहारीं गेलीं. चाळवलेली व भयग्रस्त झालेली त्या डब्यांतली गुंगणारी शांतता आतां एकाएकीं पांच दहा भीतिग्रस्त स्वरांत बोलूं लागली.

— " अरे बाबा क्या हुवा ? "

— " झाला तरी काय ? "

— " Say ! what's the matter ? "

काय झालें तें कोणालाच माहीत नव्हतं पण कांहींतरी झालं आहे, किंवा होण्याच्या बेतांत आहे, ह्या कल्पनेनें प्रत्येक मन खदखदूं लागलें. समोरच्या शास्त्रीबुवांनीं झोपेंत वासलेला " आ " मिटून टक्क डोळे उघडले. त्यांच्या खांद्यावर मान ठेवणारा मारवाडी गांगरून पगडीचें शेपूट खोचूं लागला. पलीकडच्या रोडक्या मुसलमानाचा झोपेंतला निमाज बंद पडला. मघा गुंगीनें घेरलेली ती तरुण आई आपल्या मुलाला अधिकच जोरानें छातीशीं आवळूं लागली. कसलीतरी अवर्णनीय भीति कांहीं क्षणांतच डबाभर पसरली व शंका, अनिश्चय आणि कोलाहल ह्यांनीं वायुमंडळ कांपूं लागलें.

—आणि मग दोन कर्कश, विदारक, भयाण, एंजिनच्या शिट्ट्यांनीं वातावरण फाडावयास प्रारंभ केला. विलापाचे लांबलचक हेल घेत न थांबतां वाजणाऱ्या त्या शिट्यांनीं गांगरलेलीं मनें स्तिमित केलीं. एखाद्या कापल्या जाणाऱ्या जनावरा-प्रमाणें त्या शिट्यांचा सूर होता ! त्या क्रंदनासारख्या आवाजांत कसल्यातरी अघटिताचा संदेश होता. कुठेंतरी कांहींतरी भयंकर चुकलें होतें. एकच नव्हे —तर भीषण स्वरांनीं टाहो फोडणाऱ्या दोन शिट्या ! डब्यांतले सारे आवाज आतां बुडाले, बंद पडले व मोहित होऊन त्या शिट्यांशीं एकरूप झाले. आणि मग अगदीं रडकुंडीला येऊन कोणींतरी विचारलें, " अरे भाई, आखर क्या हुवा ? "

खिडकींतून बाहेर काढलेलें डोकें आंत घेत दुसऱ्या कोणींतरी कांपणाऱ्या स्वरांत त्याला उत्तर दिलें, " बाबा रे, समोरून गाडी येते आहे ! ह्याच रूळावरून ! देवा माझ्या रे ! "

प्रत्यक्ष मृत्यूचा हात फिरल्याप्रमाणें आतां सर्वांच्या अंगावर कांटा आला. प्रत्येक चेहेरा पांढरा पडला. कोणी चुटक्या वाजवून देवाचें नांव घेतलें आणि कोणाच्या वाचा बसल्या. कुणी थोडीशीं धावपळ केली, शेजाऱ्यांना मिठ्या मारल्या व कोणी जागींच खिळून बसले. " स्वप्नांतल्या मरणाला भीत

होतास नाहीं का ? " गणू स्वतःशीं म्हणाला आणि त्यानें पाहिलें कीं ती समोरची आई आपल्या मुलाला छातीशी घट्ट — अगदीं घट्ट धरीत आहे.

आणि मग लगेच विश्वाची उलथापालथ झाल्यासारखा प्रचंड धक्का बसला व कडकडाट झाला. त्यांतच माणसांच्या किंकाळ्या मिसळल्या. दिव्यांच्या कांचा शतशः फुटल्या. असंख्य काजव्यांच्या थव्याप्रमाणें ठिणग्या व निखारे झोतानें उडाले. सामानाचे ढीग गडगडून पडले. एखाद्या ठिसूळ खड्गप्रमाणें पिचणाऱ्या कवट्यांचे किळसवाणे आवाज झाले. मरणारीं माणसें एकमेकांच्या रक्तानें ओलीं झालीं. कांहीं पळांत गणूला ह्या एकसमयावच्छेदेंकरून होणाऱ्या प्रकाराची संवेदना झाली आणि त्याला असेंही कळलें कीं डब्याच्या फाटलेल्या छपरांतून गोफणींतल्या गोट्याप्रमाणें आपण अलगत वर फेकले गेलों. फटफटणारें आकाश व मंदतेज तारे आपल्या स्वागतासाठीं वेगानें पुढें सरसावले. आपल्या वर कोणींतरी अक्षतांच्या मुठी फेकल्या आणि परलोकांतल्या एका मऊ पर्यंकावर आपलें भान हरपलें !

गणूनें शुद्धीवर येऊन डोळे किलकिले केले तेव्हां आकाशाच्या कडाशीं उदासवाण्या काळ्या ढगांचें कोंडाळें पडलें होतें व त्यांतून गुदमरलेली धूसर उषा कष्टानें बाहेर पडत होती. आवाज ! इतके भयंकर आवाज ! इतके करुण, इतके असहाय, इतके मर्मभेदी ! मानवी स्वरांतली हताश वेदना इतक्या भयानकपणें आक्रंदूं शकेल, ह्यावर गणूचा विश्वास बसेना. त्याला वाटलें हा यमपुरींतला आक्रोश आहे. त्यानें अर्धवट उघडलेले डोळे पुन्हा मिटून घेतले. देवासाठीं, पाण्यासाठीं आणि आपल्या आप्तांसाठीं अनेक घायाळ विद्रूप स्वरांत विव्हळत होते. गणूला डोळे मिटतां आले, पण त्याला आपले कान मिटतां आले नाहींत. त्या आक्रंदनानें त्याचें सुस्तावलेलें मन गदगदा हलविलें आणि मग पुन्हा गणूनें डोळे उघडले.

—छे ! ही यमपुरी होती – आणि नव्हतीही ! यमपुरींत दोन उन्मत्त हत्तींप्रमाणें परस्परांना टक्कर देऊन उलथलेलीं एंजिनें नसतात, एखाद्या तकलादू काड्याच्या पेटीप्रमाणें छिन्नविच्छिन्न होऊन पडलेले आगगाडीचे डबे नसतात आणि हातांत विजेचे दिवे घेऊन धावपळ करणारीं

जिवंत माणसें नसतात. पण गणूच्या समोरच तारेच्या खांबावर सुळीं गेल्या-सारखें कोणाचेंतरी प्रेत लटकलें होतें आणि त्या खांबावरून एक लालभडक ओघळ खालीं आला होता. मांस, मज्जा आणि हाडें, ह्यांचा रेल्वेलाइनवरच्या गिट्टींत सडा पडला होता. मोडलेल्या ट्रंका, फाटलेल बिछाने, फराळाचे डबे, इतस्ततः उधळले गेले होते. जखमी व मृत माणसांच्या रक्ताचे लोट लाइनी-पासून शेताच्या काळ्याशार जमिनीपर्यंत वाहात आले होते व वेगानें ओसंडत दूरच्या प्रवासासाठीं निघालेली ती मेलगाडी आपला प्रवास अकालींच थांबवून आतां विनाशाच्या स्तब्धतेंत मोडून पडली होती. गणूच्या डोळ्यांसमोर प्रत्यक्ष यमपुरी उभी होती.

— आणि तो — गणू शिंदे मात्र ह्या प्रलयांतून जगला होता ! गणूच्या मेंदूंत कसली तरी वेगवान् हालचाल झाली व डाव्या हातावर भार देऊन तो एकदम उठून बसला. डाव्या हाताची मूठ त्यानें डोळ्यांसमोर धरली! त्याला अलगद झेलून धरणाऱ्या गंजींतलें पिवळें धमक गवत त्याच्या मुठींत आलें आणि त्याबरोबरच कांहीं मोतीही! मोती आणि गवत ह्यांची मूठ सारख्याच बेदखलीनें फेकून देऊन गणूनें स्वतःचें सारें शरीर चाचपून पाहिलें. – नाहीं ! त्याला कोठें नुसता ओरखडा सुद्धा निघाला नव्हता ! भोवतालीं मृत्यूचें तांडव माजलें होतें, मेलगाडीच्या चिंध्या झाल्या होत्या, त्याचा डबा पिचून गेला होता, पण पिचतां पिचतां छपराचें दार मोकळें करून गणूचा डबा पिचला होता. अजस्र इंजिनें मोडलीं, डब्यांचा चक्काचूर झाला, लोखंडी रूळ उखडून निघाले – आणि तरीही दुबळ्या देहाचा गणू वांचला ! कसला अघटित प्रकार घडून गेला तें आतां गणूला कळलें, त्याच्या शरीरांतून एक शिरशिरी गेली, त्यानें एक शब्दशून्य हुंकार दिला व तो त्या गवताच्या गजीवरून सरसर खालीं घसरला.

—तो जिवंत होता ! गणू शिंदे जिवंत होता. पण त्याचे सहप्रवासी ? ती सुंदर कान्तीची तरुण स्त्री, तो बोलका मद्रासी, तो पिवळ्या पगडींतला मारवाडी ! त्या साऱ्यांचे व त्या मृत्युमुख बनलेल्या डब्यांचें गणूला आकर्षण पडलें व तो रेल्वेरुळांच्या दिशेनें धावूं लागला. त्याच्या डोक्यावरून कांहीं गवताच्या काड्या गळल्या व कांहीं मोती ! एका फुटलेल्या ट्रंकेनें गणूच्या रस्त्यावर

सोन्यामोत्यांच्या पायघड्या घातल्या होत्या. त्या तुडवीत गणू धावत होता. तो आज जिवंत होता. दौलतीचें त्याला आतां भान नव्हतें. दौलत तुडवत धावणारीं त्याचीं पावलें रक्तानें भिजलेल्या मातींत ओलावलीं तेव्हां मात्र तीं खिळून थांबलीं. त्या देखाव्यावरून डोळे उचलण्याची त्याची शक्ति नव्हती.

—कुणाच्या हातांत त्या सुंदर बाईनें आपला हात लग्नाच्या वेळीं दिला होता ? आतां तिचा हात दुसऱ्याच एका केसाळ काळ्याकुट्ट हातांत अडकलेला होता—आणि ते दोन्ही हात एकमेकांना जखडून शरीरापासून दूर दूर तुटून पडले होते. जन्मांत कधीं ज्या हातांची ओळख नव्हती, त्यांची मरणांत ही अशी भेट झाली ! तिची सुंदर कान्ति ? छेः ! नुसता चेंचलेला मांसाचा गोळा ! तो ठेचलेला म्हातारा आतां सोललेल्या कातडीनें जितका कान्तिमान दिसत होता, तितकीच ही सुद्धा ! तिच्या कोवळ्या पोराची त्या रक्तमांसाच्या चिखलांत ओळख नव्हती ! फक्त एका हाडाच्या तुकड्यावर मनगटी चमकत होती. त्या बाईजवळ बसलेल्या शास्त्रीबुवांच्या धडाचा पत्ता नव्हता आणि त्यांच्या फुटलेल्या मस्तकांतून त्यांचा मेंदू बाहेर पडला होता. पगडीखेरीज मारवाड्याची खूण सापडत नव्हती. त्या बसून पेंगणाऱ्या रोडक्या मुसलमानाचा कोसळणाऱ्या सामानाखालीं चेंदा उडाला होता आणि त्याच्या रक्ताचे पाट छाती फाटून पडलेल्या मद्राशाच्या रक्ताला मिळाले होते. कोठेंतरी वाहाणारीं रक्तें आतां अशा तऱ्हेनें परस्परांना मिळालीं ! कोठेंतरी जाणार होतें, कोठेंतरी गेलें ! कोठें जाणार होतें कोणास ठाऊक ! आणि कोठें गेलें कोणास ठाऊक ! पण हा गिट्टीचा दगडी बिछाना नियतीनें त्यांच्यासाठीं योजून ठेवला होता. इच्छांचा, आशांचा, मनोरथांचा आणि आयुष्यांचा शेवट हा येथें व्हायचा होता. तो ट्रंकेवर बसून राहाण्याचा हट्ट करणारा कच्छी ! आतां दूर फेकला गेला होता ! डब्याच्या लाकडाची सुरीसारखी टोकदार बनलेली एक ढिलपी त्याच्या आंतड्यांत शिरली होती आणि मुठीनें ती ओढून काढण्याचा प्रयत्न करीत अजूनही तो " मेरे मोती ! मेरे मोती " म्हणून विव्हळत होता.

तो देखावा पाहून गणूचे डोळे भाजले जात होते, आणि ते स्वर ऐकून गणूच्या कानाला चटके बसत होते. काल गणू मृत्यूसाठीं उतावळा झाला होता व त्याची हांक ऐकून मृत्यूनें त्याला आतां आपल्या विक्राळ स्वरूपाचें

दर्शन दिलें होतें. रक्तमांसानें माखलेल्या भूमीच्या तेवढ्या त्या तुकड्यांत मूर्तिमंत विनाश मोकळा सुटला होता. मृत्यूचें तें उग्र दर्शन गणूला असह्य वाटलें. दिपून जाऊन त्यानें त्या देखाव्यावरून आपली दृष्टि उचलली. भोवतालचा निसर्ग अगदीं शांत व अस्पर्श होता. पलीकडच्या शेतांतून पेटलेल्या शेकोटीचा धूर निघत होता. दूर गुरांचे कळप वळसे घेत होते. भूमीच्या काळ्याशार विस्तारावरून पाख्याचे अस्पष्ट स्वर उमटत होते. ते स्वर ऐकतांच कशालाही न जुमानणारी जीवनाची एक लाट गणूच्या शरीरभर पसरली व रुधिरानें डागळलेल्या त्या अघोरी देखाव्यावर पाठ फिरवून "मी जगेन–मी जगेन" म्हणून ओरडत तो पलीकडच्या शेताकडे धावत सुटला. त्याचा उजवा हात बधिरपणें अजूनही त्याच्या बाजूनें लोंबत होता पण त्याचें आतां त्याला भानही नव्हतें व दुःखही नव्हतें! धावतां धावतां त्याच्या खिशांतला सारजेचा फोटो केव्हां फेकला गेला तेंही त्याला कळलें नाहीं!

ती मृत्युभूमि शक्य तितकी मागें टाकण्यासाठीं गणू आतां धावत होता. त्याचा कंठ दाटून आला होता व डोळयांतून खळखळून अश्रु वाहात होते. आज अनेक दिवसांनंतर तो असा रडत होता. त्याचे पाय मृतांच्या थंड रक्तानें माखले होते, त्याच्या गालांवरून स्वतःचींच उष्ण आसवें ओघळत होतीं, व तो धावत होता. त्याच्या डबडबलेल्या डोळयांना समोरचें वारूळ दिसलें नाहीं. तो धडपडला, पडला, रडला व हसला.

गुडघे टेकून स्वतःला सावरून धरीत असतां त्यानें पूर्वेकडे पाहिलें तेव्हां ढगांच्या कड्यांतून वर येणारा पिवळाधमक सूर्य त्याला दिसला. एका अनावर ऊर्मी-सरशीं गणूनें आपला डावा हात उंच उभारला, मस्तक वाकविलें व सद्‌गदित कंठानें उगवत्या सूर्याला तो सांगूं लागला, "मी जगेन! नारायणा, आतां मी जरूर जगेन!"

जवळच उडून पडलेल्या सारजेच्या स्नेहमय चित्राचें हास्य अतिशय सतेज होतें, पण त्या चित्राची गणूला अजूनही आठवण नव्हती!